

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन








अनुक्रमणिका

अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २६८, जानेवारी-मार्च १९९४



**संपादक : वि. स. वाळिंबे**

संपादन समिती : प्रा. म. द. हातकणंगलेकर, डॉ. वि. भा. देशपांडे,
प्रा. विजय कसबेकर, हरी नरके, संतोष शेणई



**विज्ञापन समन्वयक : ह. ल. निपुणगे**



**मुखपृष्ठ : रविमुकुल**



**या अंकाची किंमत : २५ रुपये**

वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी : ७५ रुपये)

आजीव सदस्य शुल्क ५०० रु., वार्षिक सदस्य शुल्क ५० रु.

---



---

मुद्रक - प्रकाशक : डॉ. गं. ना. जोगळेकर, कार्यवाह,
महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता,
पुणे ४११ ०३०. (दूरभाष : ४४२९६३)

मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स, १०१९, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

अनुक्रमणिका





# अंतरंग

# संपादकीय

**अतूट भाववंधाचा प्रत्यय**

सदुसष्टावे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन गेल्या जानेवारीच्या अखेरीस पणजी येथे अत्यंत उत्साहपूर्ण वातावरणात साजरे झाले. गोमंतकाच्या निसर्गसमृद्ध भूमीमध्ये भरलेले हे तिसरे मराठी साहित्य संमेलन. यापूर्वीचे संमेलन १९६४ मध्ये आयोजित करण्यात आले होते. तीस वर्षांनंतर आपल्या येथे मायमराठीचा सोहळा साजरा होत असल्यामुळे तो पूर्णतया यशस्वी झाला पाहिजे, असा तेथल्या साहित्यरसिकांनी निर्धार केला आणि तो त्यांनी प्रत्यक्षातही आणून दाखविला. याबद्दल गोमंतक साहित्यसेवक मंडळाच्या पदाधिकाऱ्यांचे आणि कार्यकर्त्यांचे अभिनंदन करायला हवे.

गोमंतक हा सांस्कृतिकदृष्ट्या महाराष्ट्राचा अविभाज्य घटक असल्यामुळे पोर्तुगीजांच्या अमलातून मुक्त झाल्यावर तेथे मराठीच्या संवर्धनाला विशेष चालना मिळेल, अशी रास्त अपेक्षा व्यक्त केली जात होती. परंतु अनुभव वेगळा येऊ लागला. कोकणीच्या पुरस्कर्त्यांनी मराठीचा पद्धतशीर दुस्वास आरंभिला. इतकेच नव्हे, तर गोव्याच्या सार्वजनिक जीवनातील मराठीचे न्याय्य स्थान नाकारण्याच्या मत्सरी कारवाया आरंभिल्या. हे असे दुष्ट खटाटोप केले जात असतानाही महाराष्ट्र आणि गोमंतक यांच्यातील भावबंध अतूट आहेत, हे सिद्ध करण्याचे मौलिक कार्य पणजी येथे भरलेल्या साहित्य संमेलनाने पार पाडले आणि संमेलनाची ही सर्वांत लक्षणीय फलश्रुती मानली पाहिजे.

या सर्व परिस्थितीचा परामर्श संमेलनाध्यक्ष प्राचार्य राम शेवाळकर यांनी आपल्या भाषणात नेमकेपणाने घेतला.

ते म्हणाले,

"एखाद्या भाषेला नेस्तनाबूत करण्यात राज्यकर्त्यांचे सत्तासामर्थ्य सफल झाल्याचा इतिहासाचा निर्वाळा नाही. त्यामुळे गोव्यामध्ये विद्वेषाचे मळे पिकवण्याचे पर्व आता संपुष्टात यायला हवे. पृथ्वीराज चव्हाण आणि जयचंद राठोड यांच्यातल्या यादवीचा लाभ महंमद घोरीला उपटण्याची संधी पुन्हा मिळायला नको."

"मराठीचा दुस्वास करून कोकणीचा लाभ होणार नाही आणि मराठीचे तेजही क्षीण होणार नाही," हेही प्रा. शेवाळकर यांनी कोकणीच्या पुरस्कर्त्यांना आणि त्यांच्यामागे उभ्या

असलेल्या राजकीय शक्तींना चोख शब्दांत बजावले.

अर्थात, स्वतःच्या क्षुद्र हितसंबंधांसाठी फुटीरतेचे घातकी राजकारण खेळणारी मंडळी या इशाऱ्याची कितपत दखल घेतील आणि समजूतदारपणा दाखवतील याची शंका वाटते.

म्हणून मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांच्या संगोपन-संवर्धनासाठी गोमंतकियांकडून होणाऱ्या प्रयत्नांना अखिल महाराष्ट्राचा पाठिंबा लाभायला हवा. तसेच या सांस्कृतिक कामामध्ये सारा महाराष्ट्र आपल्या पाठीशी खंबीरपणे उभा आहे याचाही गोमंतकियांना प्रत्यय यायला पाहिजे.

पणजी येथे भरलेल्या संमेलनाच्या अगोदर सावंतवाडी येथे बारावे मराठी बालकुमार साहित्य संमेलन ज्येष्ठ समीक्षक आणि साहित्यिक श्री. शंकर सारडा यांच्या अध्यक्षतेखाली साजरे झाले. बालकुमार साहित्याचे मूलगामी महत्त्व सर्वांना यथार्थतेने प्रतीत व्हावे या दृष्टीने कोणते उपाय योजले जाणे आवश्यक आहेत, याची मीमांसा श्री. सारडा यांनी आपल्या भाषणात केली.

'आजचा बालकुमार संगणक युगातला असल्यामुळे आपल्यापेक्षा काही बाबतींत तो अधिक जाणकार आहे, ही वस्तुस्थिती पालकांनी लक्षात घ्यावी,' या महत्त्वाच्या मुद्याकडे सारडा यांनी लक्ष वेधविले आणि या नव्या युगाला साजेशी बालकुमार साहित्यनिर्मिती व्हायला हवी, असे अगत्यपूर्वक सुचविले.

तिसरे कामगार साहित्य संमेलन डॉ. आनंद यादव यांच्या अध्यक्षतेखाली नाशिक येथे जानेवारीच्या प्रारंभी आयोजित करण्यात आले होते. आधुनिक युगात शास्त्र हेच सत्य आणि साहित्य हाच धर्म होऊ शकतो, असे प्रतिपादन करून डॉ. यादव यांनी कामगारांना या कालोचित सत्याची आणि धर्माची कास धरावी असे आवाहन केले.

### आनंदोत्सव

गेल्या ८ नोव्हेंबरपासून महाराष्ट्रात आनंदोत्सवाला प्रारंभ झालेला आहे. पु. ल. देशपांडे यांचे अमृतमहोत्सवी वर्ष हे या आनंदोत्सवाचे निमित्त व्हावे, यावरून पुलंनी महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनामध्ये केवढी अनन्यसाधारण लोकमान्यता संपादन केली आहे, हे दिसून येते.

साहित्य, संगीत आणि अभिनय हे तीन गुण एकाच व्यक्तित्वात साकार झालेले सहसा आढळत नाहीत. पुलंच्या रूपाने हा असा दुर्मिळ त्रिवेणी संगम पाहायला मिळावा हे महाराष्ट्रीय रसिकांचे अलौकिक भाग्यच म्हणायला हवे. पुलंनी गेल्या पन्नास वर्षांमध्ये आपल्या कर्तृत्वाने महाराष्ट्राला भरभरून आनंद दिला. तसे करताना त्यांनी हातचे काहीही राखून ठेवले नाही. म्हणूनच पुलंचा वाढदिवस हा त्यांच्या आप्तांपुरता आणि स्नेहीजनांपुरता मर्यादित सोहळा राहत नाही. सारा महाराष्ट्र आणि महाराष्ट्राबाहेरचे मराठी

भाषक रसिक तो साजरा करीत असतात.

पुलंची दानत आणि दातृत्व हा तर त्यांच्या स्वभावधर्माचा विलक्षण विशेष म्हणायला हवा.

कोणाच्याही गुणाला ते मनःपूर्वक दाद देतात.

हेही या भूमीमध्ये तसे अपवादभूतच म्हणायला हवे.

अमृतमहोत्सवाच्या निमित्ताने महाराष्ट्राच्या या लाडक्या व्यक्तित्वाला अंतःकरणपूर्वक अभिवादन.

१९९३ चा साहित्य अकादमीचा पुरस्कार डॉ. विजया राजाध्यक्ष यांच्या 'मर्ढेकरांची कविता : स्वरूप आणि संदर्भ' या समीक्षाग्रंथाला लाभला.

बा. सी. मर्ढेकर यांच्यापासून मराठी नवकवितेला प्रारंभ झाला असल्यामुळे त्यांच्या काव्यप्रेरणांचा आणि काव्यविशेषांचा अभ्यास होणे आवश्यक ठरते. या दृष्टीने मर्ढेकरांसंबंधी अधिकाधिक माहिती मिळवून विजयाबाईंनी त्यांच्या कवितेचे स्वरूप आणि संदर्भ आपल्या व्यासंगाद्वारे वाचकांसमोर ठेवले आहेत. त्यांच्या या कार्याची राष्ट्रीय पातळीवरून दखल घेतली गेली याचा आनंद वाटतो.

अनुवादासंबंधीचा पुरस्कार विलास गिते यांना त्यांच्या 'रवींद्रनाथांच्या सहवासात' या बंगालीमधून मराठीमध्ये आणलेल्या पुस्तकाबद्दल मिळाला आहे. बंगाली वाङ्मय मराठीत आणण्याचे कार्य वा. गो. आपटे, भा. वि. वरेरकर प्रभृतींनी मोठ्या नेटाने अंगिकारिले होते. ती परंपरा विलास गिते चालवीत आहेत.

दोन्ही पुरस्कार-विजेत्यांचे अभिनंदन.

**शोकसमाचार**

'गोकुळ' मासिकाचे संपादक श्री. अमरेंद्र गाडगीळ यांच्या निधनाने एक व्रतस्थ व्यक्तिमत्त्व काळाच्या पडद्याआड गेले आहे.

उगवत्या पिढीवर सदाचरणाचे, राष्ट्रनिष्ठेचे, कर्तव्यपालनाचे संस्कार व्हावेत हा गाडगीळांचा आयुष्यभराचा ध्यास होता आणि त्यांचे लेखन असो, संपादन असो वा प्रकाशन असो, हे सारे त्याचसाठी चाललेले असायचे. अनेक युवकांना त्यांनी प्रोत्साहन देऊन लिहिते केले. गाडगीळ यांनी स्वतंत्रपणे तर लेखन केलेच, पण आठशेहून अधिक पुस्तके नामवंत आणि उदयोन्मुख लेखकांकडून लिहून घेतली. हे त्यांचे कार्य खरोखरच अजोड म्हटले पाहिजे.

'श्रीरामकोश' आणि 'श्रीगणेशकोश' ही अमरेंद्र गाडगीळांच्या चिकाटीची आणखी दोन लक्षणीय उदाहरणे.

आपले सारे जीवन इतिहास-संशोधनासारख्या काहीशा अलक्षित आणि किचकट



अनुक्रमणिका

क्षेत्रात व्यतीत केलेले श्री. य. न. केळकर यांचे गेल्या १३ फेब्रुवारीला देहावसान घडून आले. ते ९२ वर्षांचे होते.

'य. न.' हे साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांचे चिरंजीव. त्यामुळे बालपणापासूनच त्यांना साहित्याच्या अभ्यासाची गोडी लागली. या आवडीतूनच ते इतिहास-संशोधनाकडे वळले आणि पेशवे दफ्तराचा अभ्यास आरंभिला. त्या विषयाचे अधिकारी म्हणून य. न. केळकर ओळखले जात.

'ऐतिहासिक पोवाडे' हे त्यांचे विशेष गाजलेले पुस्तक.

अमरेंद्र गाडगीळ आणि य. न. केळकर यांच्या स्मृतीला श्रद्धांजली.

– वि. स. वाळिंबे

**मुद्रकांना आवाहन**

'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' या महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या वतीने प्रसिद्ध होत असलेल्या त्रैमासिकाच्या १९९४-९५ या वर्षातील अंकांसाठी मुद्रकांकडून दरपत्रके मागविण्यात येत आहेत.

संगणकीय अक्षरजुळणी आणि प्रतिरूप मुद्रण यासंबंधीच्या दरांसमवेत इच्छुक मुद्रकांनी आपला या क्षेत्रातील अनुभव आणि नियतकालिकीय मुद्रणाचे नमुने ३० एप्रिल १९९४ पर्यंत महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे पाठवावेत.

सर्व आनुषंगिक बाबी विचारात घेऊन परिषदेची पदाधिकारी समिती यासंबंधी निर्णय करील आणि तो अंतिम स्वरूपाचा राहील.

– प्रकाशक

उषा मा. देशमुख

# 'विशाखा' : संहिता मीमांसा

'विशाखा' हा कुसुमाग्रजांचा दुसरा काव्यसंग्रह आहे. नुकतीच या संग्रहाने पन्नाशी ओलांडली. त्याच्या आवृत्त्या आणि पुनर्मुद्रण १९४४ पासून १९९२ पर्यंत बारा वेळा झाले आहे. प्रत्येक आवृत्तीच्या हजार प्रती अंदाजाने धरल्या तरी गेल्या पन्नास वर्षांत बारा हजार प्रतींचा विक्रम या काव्यसंग्रहाने केला आहे. वारकऱ्याजवळ जशी 'ज्ञानेश्वरी', 'हरिपाठ' असतो तसा साहित्याच्या अभ्यासकाजवळ आणि जाणकार रसिकांजवळ हा संग्रह असतोच असतो. आधुनिक काळात असे भाग्य कोणत्याच काव्यसंग्रहाला अजून तरी मिळालेले नाही. एका कालखंडाची मानसिकता आणि काळाचे वास्तव या संग्रहात एकवटलेले आहे. मी दोन-तीन जुन्या प्रती बघितल्या तर हिंगण्याच्या शाळेतील भाऊबीजेसाठी बहिणींना या प्रती दिलेल्या आढळल्या. सुप्रसिद्ध कवी मंगेश पाडगावकर यांनी वा. ल. कुलकर्णी समीक्षामंचाच्या कार्यक्रमात खुद्द वालंनी आपल्या संग्रहातला 'विशाखा' हा काढून वाचावयास कसा दिला याची हृद्य आठवण सांगितली होती. आधुनिक कवींच्या आणि अभ्यासकांच्या संग्रही 'विशाखा'ची कोणती ना कोणती आवृत्ती असतेच असते. यावरून 'विशाखा' या काव्यसंग्रहाची वेगळिक लक्षात येते. आणि प्राथमिक शाळेपासून स्नातकोत्तर अभ्यासक्रमापर्यंत 'विशाखा'तील कवितांचा अभ्यास गेल्या पंचेचाळीस वर्षांत चालू आहे. 'विशाखा'मधील कवितांचे इतर भारतीय भाषांमधून आणि इंग्रजी, जर्मन, फ्रेंच, रशियन या पाश्चात्त्य भाषांतून अनुवाद झालेले आहेत.

'विशाखा' ज्या काळात प्रसिद्ध झाला त्या काळानेही 'विशाखा'तील कवितेला मोठे झालेले बघितले आहे. वि. स. खांडेकरांचे 'अर्घ्यदान' या संग्रहाला लाभले आहे. नव्हे, खांडेकरांनी पदरमोड करून हा संग्रह प्रसिद्ध केला होता. या संग्रहातील कविता १९३१ ते १९४१ या दशकातील कविता आहे. रविकिरण मंडळाच्या सांकेतिकतेतून मराठी कवितेला सोडविण्याचा प्रयत्न अनिल, बोरकर, कांत, रेगे, काणेकर हे कवी करीत होते. महाराष्ट्रातील आणि भारतातील राजकीय, सांस्कृतिक आणि सामाजिक जीवन ढवळून निघत होते. जागतिक महायुद्धाचा परिणाम संवेदनशीलतेवर सर्वच जगातील लेखकांवर पडत होता, तसा तो भारतीय लेखकांवर आणि मराठी लेखकांवरही झालेला होता.

'विशाखा'तील कविता एक स्वप्न, एक आवाहन आणि एक आव्हान घेऊन आलेली कविता ठरली. तिने केवळ वास्तव टिपले नाही किंवा केवळ उपदेशही केला नाही, तर

अभिजात सौंदर्याने नव्या-जुन्याच्या एकत्रितपणाने ती अवतीर्ण झाली. नव्या प्रतिमा, नवी प्रतीके या कवितेतून अवतरत असतानाच संस्कृत भाषेशी आणि तिच्यातील सौंदर्याशी या कवितेने नाते जोडले. स्वातंत्र्योत्सुक समाजाचे मनोगत जणू या कवितेने टिपून घेतले. त्यामुळे 'विशाखा'तील सामाजिक जाणिवा आणि राजकीय जाणिवा या कालसापेक्ष असूनही कालातीत ठरल्या. पुन्हा या कवीने आत्मनिष्ठ होण्याचे टाळले. आणि कवीने समूहातून अनुभव स्वीकारला आणि प्रगट केला. भावनात्मक आवाहनात्मकता, उत्तुंग शब्दकळा आणि उत्कटतेचा ध्यास 'विशाखा'तील कवितांतून रसिकांना नव्याने मोहवू लागला आणि तिची परिणामक्षमता कशी अलौकिक आहे याचे प्रत्यंतर आले.

'विशाखा'तील कविता तारुण्य स्वीकारणारी पण ध्येयवादी होत जाणारी अशी कविता आहे. कवीच्या व्यक्तित्वाचा ठसा मिरविणारी अशी ही कविता आहे. रचनेचे विविध अनुबंध नाट्यपूर्ण रीतीने ही कविता आविष्कृत करीत जाते आणि काही निष्ठा, काही श्रद्धा, काही आदर्श ठोसपणाने प्रतिबिंबित करते. समकालीन कवितेच्या साचलेपणाच्या काळात 'विशाखा'तील कवितेतून मराठी कवितेचा नवा विकास आणि नवी दिशा समीक्षकांना दिसू लागली होती. पुन्हा बदलत्या वास्तवाचे प्रतिबिंब या कवितेने आत्मसात केले होते आणि स्वातंत्र्यपूर्वकाळात राजकीय आणि सामाजिक परिवर्तनाचे स्वप्न समाजाला दिले. 'विशाखा'तील कवितेने विविध पातळ्यांवरील नाट्यपूर्ण संघर्षाची चित्रे रेखाटली. विडंबनापेक्षा राजकीय आणि सामाजिक वृत्ती-प्रवृत्तींचा दंभस्फोट करण्याचे व्रतच तिने स्वीकारले. आणि एखाद्या विजेसारखी ती अंधारात कडकडाट करू लागली. त्या वातावरणावर हुकूमत गाजवू लागली आणि लोकप्रियतेच्या लाटेवर आरूढ झाली.

आज काळ बदलला, मराठी कविता आमूलाग्र बदलली; नव्हे, कुसुमाग्रजांच्या कवितेतही खूप परिवर्तन झाले तरी 'विशाखा' आजही अढळ नक्षत्रासारखी का राहिली हा खरा प्रश्न पडतो. 'विशाखा'चे नाते नवतारुण्याच्या वादळी आणि उत्कट प्रणयाशी आणि बलिदानाच्या रक्तरंजित राजकीय आणि सामाजिक घटनांशी अभिजातपणे जुळलेले आहे, तसेच तिच्यातील आवाहने आणि आव्हाने मूल्याधिष्ठित असल्यामुळे ती चिरंजीव आणि चिरंतन अशी ठरली आहे. रचनेचे विविध अनुबंध तिने स्वीकारले आहेत. रसिकाला जे हवे आहे ते या संग्रहातील कवितेत उतरले आहे. 'फुलांप्रमाणे कविताही उमलतात आणि कोमेजतात' असे कुसुमाग्रजांनीच 'जाईचा कुंज' च्या प्रास्ताविकात म्हटले असले तरी 'विशाखा'तील कविता कोमेजली नाही, तर टवटवीत अशी सतेज राहिली. पुढे कुसुमाग्रजांचे अनेक काव्यसंग्रह प्रसिद्ध झालेत. 'स्वगत,' 'वादळवेल', 'मराठी माती', 'छंदोमयी', 'मुक्तायन' इत्यादी संग्रह आहेत, पण 'विशाखा' हा संग्रह अढळच राहिला. पुन्हा 'विशाखा'तील कविता त्या काळातील अतिशय गाजणारे असे जे वाङ्मयीन मासिक होते त्या मासिकातून प्रसिद्ध झालेल्या अशाच बहुतांश कविता आहेत आणि या 'जोत्स्ना'








मासिकाचे संपादक स्वतः वि. स. खांडेकर आणि वा. रा. ढवळे हे होते हाही परिणाम लक्षात घेतला पाहिजे. काव्यप्रेमी रसिकांचे, टीकाकारांचे आणि ज्येष्ठ साहित्यिकांचे लक्ष कुसुमाग्रजांच्या 'विशाखा' मधील कवितांनी वेधून घेतले होते. कागदखरेदीपासून प्रस्तावनेच्या लेखनापर्यंत साऱ्या गोष्टी निःस्वार्थीपणाने केल्या आणि 'विशाखा' हा संग्रह तयार स्वरूपात केवळ वाचकांच्याच नव्हे, तर खुद्द कवीच्याही हाती दिला (विराम चिन्हे-वि. वा. शिरवाडकर 'नंदादीप' पृष्ठ ९९), यावरून त्या काळातील वाङ्मयीन संस्कृतीवर प्रकाश पडतो. माधव ज्यूलियन आणि तांबे यांच्या प्रभावाखाली असलेली मराठी कविता जणू मुक्त झाली आणि ती स्वयंप्रेरणेने वाटचाल करू लागली. या घटनेचे प्रसादचिन्ह म्हणजे 'विशाखा' हा काव्यसंग्रह होय. क्रांतीचा आवेश, स्वातंत्र्याविषयीची ओढ, भविष्याविषयीची निस्सीम श्रद्धा आणि मानवतावादावरील अढळ विश्वास ही मूल्ये आजही तितकीच महत्त्वाची ठरतात आणि 'विशाखा'तील कविता पुनःपुन्हा वाचावी अशी वाटत राहते. सुभाषितासारख्या ओळी आजही रसिकांच्या जिभेवर असतात.

मराठीतील आज मान्यता पावलेले सर्व लेखक १९३०/३१च्या आगेमागे लिहू लागले होते. कुसुमावती, अनिल, सावरकर, कवी गोविंद, आचार्य अत्रे, वरेरकर, पु. शि. रेगे यांनी १९३०/३१च्या आगेमागे लेखनास सुरुवात केली होती. त्या काळातील तरुण पिढीच्या मानसिकतेचे दर्शन 'विशाखा'तून घडलेले आहे. समाजमनाचे हृद्गत आणि राजकीय सत्ताधाऱ्यांविरुद्धचे स्वगत विशाखातून व्यक्त झाले. त्या काळातील कथा-कादंबरीमधून प्रगट होणारी स्वातंत्र्याकांक्षा कुसुमाग्रजांच्या 'विशाखा'तून जोमाने प्रवाही ठरली. तरुणांच्या बदलत्या वृत्ती-प्रवृत्ती आणि तिला छेद देणारी परिस्थिती अशा विरोधी ताणात तरुण पिढी त्या काळात अस्वस्थ होती, आणि त्या काळात 'विशाखा' काव्यसंग्रहाने तरुण मनांना आत्मबल दिलेले दिसते. आजही या संग्रहाने रसिकांना काव्यप्रेमींना आत्मबळ दिलेले आहे. गावागावातून आणि खेड्यापाड्यातून 'विशाखा'ला पन्नास वर्षे पूर्ण झाल्याबद्दल काव्यमेळावे भरले होते, आणि 'विशाखा'ची सुवर्णमहोत्सवी आवृत्ती कुसुमाग्रज प्रतिष्ठान आणि कॉन्टिनेंटल प्रकाशन यांनी मिळून सहकार्याने १९९२ मध्ये काढली आहे. "विशाखा'चा सुवर्णमहोत्सव ही मराठी काव्यक्षेत्रातील एक ऐतिहासिक महत्त्वाची आणि असंख्य रसिकांना आनंददायी वाटावी अशी घटना आहे," असे मनोगत सुवर्ण महोत्सवी आवृत्तीत व्यक्त झाले आहे.

'विशाखा'ची पहिली आवृत्ती माझ्या समोर आहे. आणि बारावी सुवर्णमहोत्सवी आवृत्तीही आहे. या आवृत्त्यांचा विचार करावयाचा आहे. 'विशाखा'ची पहिली आवृत्ती मार्च १९४२ मध्ये प्रसिद्ध झाली आणि जुलैच्या 'सह्याद्री'मध्ये प्रा. रा. श्री. जोगांनी आणि महाराष्ट्र साहित्य पत्रिकेमध्ये प्रा. ना. मा. संत यांनी परीक्षण लेख लिहिले होते. म्हणजे 'विशाखा' प्रसिद्ध होताच मान्यवर वाङ्मयीन मासिकांतून मान्यवर लेखकांची प्रतिक्रिया

लगेचच व्यक्त झाली होती. 'विशाखा'ची मुखपृष्ठचित्रेही काळानुसार बदलत गेली आहेत. पहिल्या आवृत्तीवर 'खिडकीतून येणारे प्रकाशाचे झोत' असे त्याचे स्वरूप होते आणि दीनानाथ दलाल यांनी रेखाटन केले होते. या आवृत्तीचे प्रकाशक वि. स. खांडेकर, खासबाग कोल्हापूर हे असून मुद्रक कृ. ह. सहस्रबुद्धे श्री ज्ञानेश्वर प्रेस कोल्हापूर हे होते. एकूण पृष्ठे एकशे सतरा, मूल्य सव्वा रुपया फक्त होता. 'दादा आणि माई' यांच्या स्मृतीस तो अर्पण केला होता व हे दुसरे पृष्ठ सर्व आवृत्त्यांत सारखेच असून फक्त वरखाली असा मजकूर घेतला गेला आहे. तसेच 'अर्घ्यदान' ही वि. स. खांडेकर यांची प्रस्तावनाही सर्व आवृत्त्यांतून आणि पुनर्मुद्रणातून स्वीकारली गेली आहे. पृष्ठ पाच ते सोळा अशी एकूण बारा पृष्ठांची प्रस्तावना वि. स. खांडेकर यांनी लिहिली आहे. पहिल्या आवृत्तीचा कागद जाड आहे व तिला अनुक्रमणिका नाही. अर्घ्यदानानंतर एकदम कविता सुरू झाल्या आहेत. पहिल्या आवृत्तीत एकूण कविता बावन्न असून पुढे १९४४ मध्ये निघालेल्या दुसऱ्या आवृत्तीत एक कविता बदलून आणखी पाच कवितांची भर घातली गेली आहे व ती बाराव्या आवृत्तीपर्यंत जशीच्या तशीच स्वीकारली गेली आहे. दुसऱ्या आवृत्तीपासून पाचव्या आवृत्तीपर्यंत मोघे प्रकाशनाकडे 'विशाखा' संग्रह होता. पण पुढे सहाव्या आवृत्तीपासून तो कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे या संस्थेकडे गेला व सध्याची बारावी आवृत्ती कुसुमाग्रज प्रतिष्ठान, नाशिक आणि कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे यांनी एकत्रित सुवर्ण महोत्सवी आवृत्ती सिद्ध केली आहे. तीतही एकूण सत्तावन्न कविता आहेत. पण पहिल्या आवृत्तीत एकूण बावन्न कविता आहेत. १९४४ पासून म्हणजे दुसऱ्या आवृत्तीत 'कुतूहल' या कवितेनंतर 'अससि कुठे तू', 'भक्तिभाव', 'नेता', 'बालकवी', 'वनराणी' या पाच कविता आल्या असून पुढे 'देवाच्या दारी' ही कविता आलेली आहे. 'कुतूहल'ची पहिल्या आवृत्तीत स्थळकाळाची नोंद नाही. दुसऱ्या आवृत्तीपासून ती आहे. 'अहिनकुल' याही कवितेत असेच दिसून येते. पहिल्या आवृत्तीत 'प्रेम'ही कविता आली आहे, पण दुसऱ्या आवृत्तीत 'प्रेम' या कवितेऐवजी 'नदीकिनारी', (१९३५) ही कविता त्याच मात्रावृत्ताची घेतलेली आहे. फक्त शीर्षक बदलले आहे. पुढील सर्व आवृत्त्यांत हा बदल झाला आहे. दुसऱ्या आवृत्तीपासून मूळ बावन्न ही कवितासंख्या न राहता पाच कवितांची भर पडल्यामुळे सत्तावन्न ही संख्या झाली आहे.

पहिल्या आवृत्तीपेक्षा दुसऱ्या आवृत्तीत कविता जशा वाढल्या आहेत तशाच काही कवितांत पुढे कोणताही बदल न झालेल्या अशाही कविता आहेत. उदा. 'प्रतीक्षा', 'तू उंच गढी राहसी', 'विजयोन्माद', 'उमर खैय्याम', 'ऋण', 'सैगल', 'बळी', 'टिळकांच्या पुतळ्याजवळ', 'हा काठोकाठ कटाह भरा', 'जा जरा पूर्वेकडे', 'गुलामा', 'आव्हान', 'ग्रीष्माची चाहूल', 'मूर्तिभंजक', 'पृथ्वीचे प्रेमगीत', 'प्रीतिवीण', 'जालियनवाला बाग', 'आस', 'कोलंबसाचे गर्वगीत', या कविता बाराव्या आवृत्तीपर्यंत जशाच्या तशाच छापलेल्या आहेत. त्यांच्या रचनेत, आविष्करणात कोणताही बदल झालेला नाही. मात्र काही



अनुक्रमणिका

कवितांच्या रचनेत बदल झालेला दुसऱ्या आवृत्तीत दिसून येतो.

'विशाखा'मधील पहिली कविता 'दूर मनोऱ्यात' ही आहे. पहिल्या आवृत्तीत चार ओळींचे कडवे बांधले आहे. सुनीत पद्धतींचे चार ओळींची तीन कडवी आणि दोन ओळींचे अखेरचे कडवे अशी रचना होती पण दुसऱ्या आवृत्तीत मात्र दोन ओळींची सात कडवी बांधली गेली आहेत. 'लिलाव' ही एकविसावी कविताही पहिल्या आवृत्तीत सलग छापली आहे, पण दुसऱ्या आवृत्तीपासून चार ओळींचे कडवे पाडून बांधणी केली आहे. 'बळी' पहिल्या आवृत्तीत चार ओळींचे एक कडवे अशी सात कडवी आणि दोन ओळींचे आठवे कडवे आले, पण पुढील आवृत्त्यांतून दोन ओळींची पंधरा कडवी तयार केली आहेत. 'गुलाम' पहिल्या आवृत्तीत चार ओळींचे कडवे आहे तर पुढच्या आवृत्तीत दोन ओळींचे कडवे केले गेले आहे. पहिल्या आवृत्तीत 'तू उंच गढी राहसि' आणि 'प्रीतिवीण' या सलग कविता आहेत. पण दुसऱ्या आवृत्तीपासून दोन-दोन ओळींची स्वतंत्र कडवी तयार केली आहेत.

'विशाखा'तील अडतिसावी कविता पहिल्या आवृत्तीत 'एका कवीस !' या शीर्षकाने आली होती, पण दुसऱ्या आवृत्तीपासून ही १९३६ सालची कविता 'बायरन' या शीर्षकाने सर्वदूर आलेली आहे. असाच शीर्षकात बदल 'डम्डमच्या तुरुंगात' या मूळ कवितेचा 'क्रांतीचा जयजयकार !' या शीर्षकात झाला आहे. 'विशाखा'तील शेवटची कविता 'उपसंहार' म्हणून पहिल्या आवृत्तीत आली होती, पण दुसऱ्या आवृत्तीत 'समिधाच सख्या या' या नावाने ती आलेली आहे, तीत पुन्हा परिवर्तन झालेले नाही.

'विशाखा'मधील काही कवितांच्या शीर्षकानंतर छोटेसे गद्य टिपण कवीने दिलेले आहे, ते पहिल्या आवृत्तीपासून बाराव्या आवृत्तीपर्यंत कायम राहिलेले आहे. 'सात', 'जा जरा पूर्वेकडे', 'क्रांतीचा जयजयकार' या कवितांच्या सुरुवातीलाच टिपणे आली आहेत, आणि कवितेचा हेतू त्यातून विशद केला गेला आहे.

'विशाखा' या काव्यसंग्रहातील कवितांवर, आठ-दहा कविता वगळल्या तर स्थळकाळाच्या नोंदी दिलेल्या आहेत. काही कवितांवर संपूर्ण तारीखही नोंदविली गेली आहे. त्यावरून सर्वाधिक कविता नाशिक, नंतर पुणे, नंतर मुंबई या कुसुमाग्रजांच्या वास्तव्यातील कविता आहेत. १९३७/३८ मधल्या कविता पुण्यातील आहेत, १९३९/४० मधल्या मुंबईच्या आहेत, आणि १९३१/३२ पासून १९३७ पर्यंतच्या कविता नाशकातल्या आहेत. पुण्याला 'प्रभात' आणि 'लोकशक्ती' या वृत्तपत्रांत शिरवाडकर त्या काळात सहसंपादकाचे काम करीत होते त्या काळात पुण्यातील कविता 'विशाखा'त आल्या आहेत. 'क्रांतीचा जयजयकार' ही त्यांतलीच एक आहे. 'प्रभात' मधून पुन्हा मुंबईला त्रिभुवन रोड येथे 'धनुर्धारी'त शिरवाडकर संपादनाचे काम करू लागले. मुंबईच्या कविता त्या काळातल्या आहेत. नंतर त्यांनी 'धनुर्धारी' सोडला आणि शिरवाडकर कायमचे नाशिककर झाले. ऐन तारुण्यातील अशी 'विशाखा'तील कविता आहे आणि कवीच्या ऐन उमेदीतील अशी ती कविता ठरली.

'अवशेष', 'पृथ्वीचें प्रेमगीत', 'सहानुभूती', 'प्रकाशप्रभू', 'जीवनलहरी', 'भावकणिका, 'प्रीतिवीण', 'सात' या महत्त्वाच्या कवितांची स्थळकाळाची नोंद नाही. उलट पहिल्या आवृत्तीत ज्या कवितांची नोंद नव्हती त्या काही कवितांच्या स्थळकाळाची नोंद दुसऱ्या आवृत्तीत आलेली आहे आणि पुढील सर्व आवृत्त्यांत ती स्वीकारली गेली आहे. उदा. 'अहिनकुल' पुणे १९३८ असा उल्लेख दुसऱ्या आवृत्तीत झाला आहे व जातिद्राक्षकन्या हाही वृत्ताचा उल्लेख आलेला आहे, तो पहिल्या आवृत्तीत नाही. 'हिमलाट' जातिद्राक्षकन्या असा दुसऱ्या आवृत्तीपासून उल्लेख येतो. 'मातीची दर्पोक्ती' या कवितेतही पहिल्या आवृत्तीत वृत्ताचा उल्लेख नाही, पण दुसऱ्या आवृत्तीपासून तो आलेला आहे. 'विशाखा' मध्ये दोनच दीर्घ कविता आहेत. एक 'मूर्तिभंजक' आणि दुसरी 'देवाचिया दारी' ह्या होय. 'मेघास' या कवितेचा जातिमोहिनी असा उल्लेख पहिल्या आवृत्तीत आलेला आहे. दुसऱ्या आवृत्तीपासून तो काढून टाकला आहे, असेही झालेले आहे. अनेक कवितांत मुद्रणदोष आणि ऱ्हस्वदीर्घाच्या बदलांचाही आढळ होतो. पण तो बाह्य स्वरूपाचा ठरतो.

**'विशाखा'ची आधार आवृत्ती**

'विशाखा'च्या प्रकाशनाचे एकूण चार[१] प्रवाह झालेले गेल्या पन्नास वर्षांत दिसून येतात. पहिली आवृत्ती ही खांडेकरांनी स्वतः पदरमोड करून छापली व तिच्यात बावन्न कविता होत्या. पहिल्या व दुसऱ्या आवृत्तीत खूपच फरक पडलेला आहे. किंबहुना दुसरी आवृत्ती हीच पुढच्या बाराव्या आवृत्तीपर्यंतची आधारआवृत्ती ठरते. या दृष्टीने 'विशाखा'ची दुसरी आवृत्ती ही केंद्रीय आवृत्ती म्हणून स्वीकारावयास हरकत नाही. पहिल्या आवृत्तीत पाच कविता कमी असूनही पृष्ठ एकशेसतरा होते, तर दुसऱ्या आवृत्तीत पाच कवितांची भर पडूनही पृष्ठसंख्या चौऱ्याण्णव अशी आहे. तिसऱ्या, चौथ्या आणि पाचव्या आवृत्तीपर्यंत पृष्ठसंख्या चौऱ्याण्णवच होती. सहाव्या आवृत्तीपासून ती बदलली ती अकराव्या आवृत्तीपर्यंत. अकराव्या आवृत्तीची पृष्ठसंख्या एकशे अकरा आहे. म्हणजे कॉन्टिनेंटल प्रकाशनाकडे 'विशाखा' सहाव्या आवृत्तीपासून अकराव्या आवृत्तीपर्यंत प्रसिद्ध झाली व पृष्ठसंख्या एकशेदहा-अकरा अशीच कायम राहिली आहे. पण बाराव्या आवृत्तीत मात्र फरक पडला आहे. डिलक्स आवृत्ती म्हणून ती प्रकाशित झाली आहे व पृष्ठसंख्या एकशेसहा अशी आहे.

'विशाखा'ची पहिली आवृत्ती हा एक घटक ठरतो. दुसरी आवृत्ती ते पाचवी आवृत्ती हा दुसरा घटक ठरतो. सहावी आवृत्ती ते अकरावी आवृत्ती हा तिसरा घटक ठरतो, आणि बारावी आवृत्ती हा चौथा घटक[२] ठरतो. पैकी पहिली, दुसरी ते पाचवी, सहावी ते अकरावी ही स्वतंत्र प्रकाशने वि.स.खांडेकर, दा.न.मोघे, अनंतराव कुलकर्णी यांनी केली असून बाराव्या आवृत्तीचे प्रकाशन संयुक्तरीत्या झालेले आहे. कुसुमाग्रज प्रतिष्ठान आणि कॉन्टिनेंटल प्रकाशन यांनी मिळून बारावी आवृत्ती प्रसिद्ध केली आहे. पहिल्या आवृत्तीत आणि दुसऱ्या आवृत्तीत बरीच

परिष्करणे आहेत. प्रत्येक कवितेच्या जवळजवळ सर्व जातिमात्रावृत्तांच्या नोंदी दुसऱ्या आवृत्तीत केलेल्या आहेत, त्या पाचव्या आवृत्तीपर्यंत. पण सहाव्या आवृत्तीपासून पूर्ण तारखा जशा काढून टाकल्या आहेत तशा मात्रा वृत्तछंदांच्या नोंदीही गाळल्या आहेत. आणि बाराव्या आवृत्तीत मात्र विशाखा : छंदोदर्शन (पृष्ठ १०४) असे प्राचार्य वसंत पाटील यांचे छोटेसे टिपण दिले गेले आहे व स्पष्टीकरण केले आहे. पहिल्या आवृत्तीची किंमत सव्वा रुपया ही वाढत वाढत पन्नास वर्षांत बाराव्या आवृत्तीची किंमत पन्नास रुपये झालेली दिसते. पहिल्यापासूनच्या 'विशाखा'च्या सर्व आवृत्या क्राऊन साइजच्या आहेत. फक्त अकरावी आणि बारावी आवृत्ती डेमी साइज मध्ये आहे. बाराव्या आवृत्तीत 'देणं' ही कुसुमाग्रजांची कविता त्यांच्यात हस्ताक्षरात छापली असून श्री. ग. ज. म्हात्रे अध्यक्ष, कुसुमाग्रज प्रतिष्ठान यांचे मनोगत जोडले आहे. मूळ कवितातील सुटे शब्द बाराव्या आवृत्तीत जोडून घेतले आहेत. उदा. 'मातीची दर्पोक्ती' या कवितेत सातव्या कडव्याच्या पहिल्या ओळीत 'धनवंत असू द्या असू द्या दीन भिकारी' असे मूळ प्रतीतून असताना बाराव्या आवृत्तीत धनवंत असूद्या, असूद्या असे एक शब्द करून छापले आहे. शीर्षके ऱ्हस्वान्त होती ती दीर्घान्त झालीत. कवितांना क्रमांक दिले गेले आहेत. अर्थात ते अकराव्या आवृत्तीतही दिलेले होतेच.

प्रचण्ड, स्तम्भावर, शान्त, दुभङग्, मन्थर, मङ्गल, शान्ती अशा ज्या शब्दलेखनाच्या संस्कृतपद्धतीच्या कवितेच्या लकबी होत्या त्याही बाराव्या आवृत्तीत हद्पार झाल्या आहेत. प्रचंड, स्तंभावर, शांत, दुभंग, मंथर, मंगल, शांती अशा पद्धतीने लेखन झाले आहे. कुसुमाग्रजांच्या कवितेची एक विशिष्ट लकब आहे ती त्यामुळे नाहीशी झाली आहे. अशी सर्व कविता 'विशाखा'तील दाखविता येईल. येथे फक्त नमुना घेतला आहे. मेघास (४२) 'बांधावरि'च्या ऐवजी 'बांधावर' असे केले आहे. 'प्रतीक्षा' दुरी जाहला च्या ऐवजी दूर जाहला असे आहे. 'ळ'च्या ऐवजी 'ल' आणि 'ल' च्या ऐवजी 'ळ' असेही झालेले आहे. 'कोमल' आणि 'कोमळ', पाउलं > पाऊले असे परिष्करण झालेले आहे. त्यामुळे कवितेच्या गाभ्याला निश्चितच धक्का पोहोचतो.

काही कवितांतील अवतरणचिन्हे काढून टाकलेली आहेत. उदा. 'मातीची दर्पोक्ती' या कवितेत पाचव्या कडव्याच्या चौथ्या ओळीत 'स्मृति'तीलही त्यांच्या ओळी अंधुक होती; मूळ ओळी अशा आहेत :

*"कित्येक शिकंदर जग जिंकुनिया गेले*
*कित्येक वाल्मिकी अखेर इकडे आले*
*कित्येक मनू अन् मुनी धुळीने गिळले*
*स्मृतितीलही त्यांच्या ओळी अंधुक होती*
*मातीवर चढणे एक नवा थर अंती !"*

आता पहिल्या पाच आवृत्यांतून 'स्मृति' अवतरणात असा शब्द आला आहे.

मनुस्मृतीचा तो संदर्भ आहे हे उघड आहे, पण स्मृती म्हणजे आठवण असा अन्वय घेऊन अवतरण काढून टाकले गेले आहे, याला काय म्हणावे ? 'विशाखा'ची मुखपृष्ठे प्रत्येक आवृत्तीप्रमाणे बदलत गेली आहेत. आणि कालमानाप्रमाणे 'विशाखा' नक्षत्राच्या दोन्ही चांदण्या जाऊन 'मंदिर, अग्निकुंड, तरुण स्त्रीचे अर्घ्यदान' असे अनेकरंगी चित्राचे मुखपृष्ठ आले. आठव्या आवृत्तीवर नवचित्रकलेतील चित्र आले, तर बाराव्या आवृत्तीवर निळ्या रंगाच्या पार्श्वभूमीवर फक्त संग्रहाचे व कवीचे नाव घातलेले आहे व उडणाऱ्या पक्ष्याचे रेखाटन सोनेरी रंगात आलेले आहे.

कालमानाप्रमाणे जसा लेखनाच्या ऱ्हस्वदीर्घात फरक पडत गेला तसाच शब्दांगातही फरक पडत गेलेला आहे. मूळ कवितांना अनुक्रम नव्हते ते पुढच्या संग्रहातून आणि त्यांच्या आवृत्तीतून आलेले आहेत. शीर्षकांत जे बदल झाले ते दुसऱ्या आवृत्तीपासून पुढे असे बदल झालेले नाहीत. मूळ कवीने केलेले बदल दुसऱ्या आवृत्तीत स्पष्ट होतात, पण पुढे मात्र सहाव्या आवृत्तीपासून प्रकाशकाने बदल केले असावेत अशी शंका येते. कारण दुसऱ्या आवृत्तीपासून पाचव्या आवृत्तीपर्यंत मात्रावृत्त, तारखा, स्थळ, नोंदी आलेल्या आहेत. सहाव्या आवृत्तीपासून मात्रावृत्त पूर्णपणाने काढून टाकली गेली आहेत. स्थळकाळाच्या नोंदीही मूळ जशाच्या तशा स्वीकारलेल्या नाहीत. उदाहरणार्थ मूळ पूर्ण तारीख असेल तर फक्त सालाचा उल्लेख करावयाचा अशी पद्धती अनुसरलेली दिसते.

'विशाखा'तील कवितांचे पाठसंशोधन करताना वरील काही गोष्टी जशा निदर्शनाला आल्या आहेत तसेच काही वेळा शब्दांमध्ये बदल झालेला दिसतो. काही वेळा ओळींमध्येही बदल झालेला आढळून येतो. त्याचा विचार केला पाहिजे, कारण त्यावरून एकूण कवितेचे स्वरूप, तीत झालेले परिवर्तन यावर प्रकाश टाकता येईल. 'अहिनकुल' या कवितेत पहिल्या आवृत्तीत 'जणु ज्वालामुखिला येई अचानक जाग' अशी पहिल्या कडव्याची चौथी ओळ आहे, तर दुसऱ्या आवृत्तीपासून 'ये ज्वालामुखिला जणूं अचानक जाग'. 'येई' हा शब्द काढून टाकला आहे. 'गर्जा जयजयकार' या कवितेत साखळयाऐवजी शृंखला असा संस्कृत शब्द दुसऱ्या आवृत्तीपासून उपयोजिला गेला आहे.

'हिमलाट' या दुसऱ्या कवितेच्या रचनेत थोडा बदल झालेला दिसून येतो. तीन आणि दोन असे पाच ओळींचे कडवे पहिल्या आवृत्तीत होते, तर दुसऱ्या आवृत्तीपासून सलग पाच ओळींचे कडवे सिद्ध झाले आहे. सातव्या ओळीत 'श्रीमंत महाली' या दोन शब्दांत आडवी रेघ घेतली गेली, पण पुढच्या आवृत्त्यांतून ती काढून टाकून दोन्ही स्वतंत्र शब्द ओळीत आलेले आहेत. अठराव्या ओळीत 'सरणातिल'मधील 'ति' ऱ्हस्व होती, पण दुसऱ्या आवृत्तीपासून 'ती' दीर्घ लिहिली गेली आहे आणि समग्र कविता एकाच पृष्ठावर घेतली गेली आहे.

'स्वप्नांची समाप्ति' या कवितेत नवव्या कडव्याच्या दुसऱ्या ओळीत 'पडे दूर फूलरास' असा शब्दचरण आलेला आहे. पण दुसऱ्या आवृत्तीपासून 'पडे दूर पुष्प-रास'











असा फूलच्या ऐवजी संस्कृत पुष्प हा शब्द स्वीकारला गेला असून बाराव्या आवृत्तीत पुष्प-रास असे शब्द न येता पुष्परास असा एक शब्द तयार केला गेला आहे. उलटपक्षी रूप-रङ्ग असा सर्व आवृत्त्यांतून येणारा शब्द बाराव्या आवृत्तीत 'रूप-रंग' असाही आलेला दिसतो. पहिल्या आवृत्तीपासून दहाव्या आवृत्तीपर्यंत कवितांना अनुक्रम दिलेला नाही. पण अकराव्या आणि बाराव्या आवृत्तीपासून तसा अनुक्रम दिलेला आहे. 'अहिनकुल' या कवितेच्या तिसऱ्या कडव्यात पहिल्या आवृत्तीपासून पाचव्या आवृत्तीपर्यंत 'जणु गुलाम सारे या सम्राटापुढती' अशी ओळ आलेली आहे. पण सहाव्या आवृत्तीपासून बाराव्या आवृत्तीपर्यंत 'जग गुलाम सारे या सम्राटापुढती' असेच स्वीकारले गेले आहे. दुसऱ्या आवृत्तीपासून पाचव्या आवृत्तीपर्यंत 'मातीची दर्पोक्ती' या कवितेत जाति द्राक्षकन्या असा उल्लेख आहे, पण सहाव्या आवृत्तीपासून बाराव्या आवृत्तीपर्यंत तो काढून टाकला गेला आहे.

'गोदाकाठचा संधिकाल'मध्ये दहाव्या कडव्यात 'वाडा पडका नदितीरावर' अशी पहिल्या व दुसऱ्या आवृत्तीत ओळ आली आहे. तिसऱ्या आवृत्तीपासून बाराव्या आवृत्तीपर्यंत 'वाडा पडका नदितटावर' असे तीर > तट झाले आहे. 'जा जरा पूर्वेकडे' या कवितेतील गद्यटीपेतही शब्द बदल झाला आहे. 'चीन जपानी युद्धात (१ ते ५ आवृत्त्या) चाललेले राक्षसी अत्याचार या कवितेत अभिप्रेत आहेत.' 'झालेले' असे 'चाललेले' ऐवजी भूतकाळाचे रूप योजिले आहे. 'उमरखैयाम'च्या चौथ्या कडव्याच्या चौथ्या ओळीत 'पसरून' असा शब्द आहे. पण सहाव्या आवृत्तीपासून पुढे 'पसरुनि' असे त्याचे रूप झाले आहे. 'अवशेष' या कवितेत 'मोहक दृश्ये'च्या ऐवजी 'दृश्ये मोहक' असे शब्दवदल आणि शब्दांची उलटापालट केलेली दिसते. 'बंदी' पाचव्या कडव्याच्या पहिल्या ओळीत 'स्तब्ध झाला अन् शेवटी शिणोनी' असे पहिल्या आवृत्तीत आहे, तर दुसऱ्या आवृत्तीपासून बाराव्या आवृत्तीपर्यंत 'शांत झाला अन् शेवटी शिणोनी' स्तब्ध > शांत असा बदल केला आहे. 'प्रकाशप्रभू'मध्ये चौथ्या कडव्यात पहिल्या ओळीत 'करांगुली तेजोमय स्पर्शुन'च्या ऐवजी 'करांगुली तेजोमय लागुन' स्पर्शुन > लागून असा बदल केला आहे; किंवा 'प्रकाशप्रभुचे असंख्य प्रेषित'च्याऐवजी दुसऱ्या आवृत्तीपासून 'असंख्य रवि-राजांचे प्रेषित' असा शब्दबदल केला आहे. 'उज्ज्वल ज्योती'ऐवजी 'ज्योती उज्ज्वल' असे शब्दपरिवर्तनही केले आहे. 'भावकणिका'मध्ये अनेक वचनांचे एकवचन केले आहे. पाचवे कडवे तिसरी ओळ 'उत्फुल्ल स्तनें ती' दुसऱ्या आवृत्तीत 'उत्फुल्ल स्तन ते', 'सैगल' या कवितेत 'पारिजातकाच्यां कळयांचा कोमल वर्षाव' अशी पहिल्या आवृत्तीतील ओळ आहे, तर दुसऱ्या आवृत्तीपासून 'पारिजातकाच्या फुलांचा कोमल वर्षाव' असे कळीचे फूल झालेले आहे, (१/४). 'कुतूहल' या कवितेत दुसऱ्या कडव्याच्या तिसऱ्या ओळीत 'कलेकलेने चंद्रासह नवप्रेमही मावळले' असे शब्द येतात. दुसऱ्या आवृत्तीपासून त्यात परिवर्तन झाले ते

बाराव्या आवृत्तीपर्यंत! 'कलेकलेने चंद्रापरि नवप्रेमही मावळले' 'चंद्रासह'च्या ऐवजी 'चंद्रापरि' असा बदल केला गेला. शेवटची कविता 'उपसंहार' किंवा 'समिधाच सख्या या!' या कवितेत 'अंकुरती तुरळक परि तीरावर वेली' असे पहिल्या आवृत्तीत आले आहे तर दुसऱ्या आवृत्तीपासून 'तीरावर तुरळक परि अंकुरति वेली' अशी केवळ शब्दांची उलटापालट केलेली आहे. 'प्रतीक्षा' या कवितेत दुरि जाहला > दूर जाहला असा (५।१) बदल केला आहे. 'मेघास' ४२ या कवितेत 'बांधावरि'च्या ऐवजी 'बांधावर' असा शब्द बदलला आहे.

गेयता, नादानुकूलतां, लयबद्धता अधिक परिणामकारक व्हावी हा या शब्दविपर्ययांचा हेतू असला पाहिजे. 'दुरि जाहला'पेक्षा 'दूर जाहला' अशी सुलभीकरणाची प्रक्रियाही घडलेली दिसते. दुसऱ्या आवृत्तीत झालेले बदल हे मूळ कवीने केलेले बदल आहेत हे स्पष्टच होते. पण पुढे याच मुद्रणकाळात बदल झाले असावेत अशी शंका येते. कारण ज्या क्रमाने आणि शब्दतोडीतून मांडणी केली आहे त्या क्रमामुळे आणि शब्दतोडीमुळे किंवा शब्दजुळणीमुळे मूळ आशयात फरक पडतो. कवितेतील एखादे टिंबही आशयसूचक असू शकते. त्यादृष्टीने बाराव्या आवृत्तीत तर खूपच घालमेल झाली आहे आणि संहिता संशोधनशास्त्रानुसार ती तर भ्रष्ट आवृत्ती ठरते इतकी मूळ आवृत्तीपासून ती दूर दूर गेली आहे.

'विशाखा'तील कवितांचे पाठसंशोधन करताना शब्दांची फिरवाफिरव जशी लक्षात येते तशीच ओळींमध्येही बरेच शब्दपरिवर्तनाचे दाखले मिळतात. पहिल्या आणि दुसऱ्या आवृत्तीत हे विशेषत्वाने झालेले आहे. 'मातीची दर्पोक्ती' या कवितेत आठव्या कडव्याची चौथी ओळ 'हा कल्पक मेंदुहि अखेर होइल माती' अशी आहे. पण दुसऱ्या आवृत्तीपासून तीत बदल झाला तो असा : 'त्या व्याकुल मतिला इथेच अंतिम शांती' पूर्णपणाने ही ओळ बदलली गेली. शब्दबदल किंवा शब्दांची उलटापालट अशी न होता मेंदूच्याऐवजी मती आणि 'अखेर होईल माती'च्या ऐवजी अर्थाला जवळ जाणारी अशी 'इथेच अंतिम शांती' असा बदल झालेला आहे. अकराव्या आणि बाराव्या आवृत्तीत 'मती' आणि 'व्याकुळ' या शब्दांची उलटापालट झाली आहे. 'त्या मतीस व्याकुळ इथेच अंतिम शान्ती' म्हणजे 'व्याकुळ मतीला' याऐवजी 'मतीस व्याकुळ' असे शब्द फिरविले गेले.

'गोदाकाठचा संधिकाल' पहिल्या आवृत्तीत

*खंड ढगाचा एक पांढरा*
*संथ कोपऱ्यामध्ये बिचारा*

अशा ओळी आहेत तर दुसऱ्या आवृत्तीपासून बाराव्या आवृत्तीपर्यंत-

*अभ्रखंड तो अचल पांढरा*
*पडे पारवा झडुनि पिसारा*

कुसुमाग्रजांच्या कवितेत मराठी शब्दांचे संस्कृत वळण 'विशाखा'त प्राधान्याने दिसून

येते. फूलरास > पुष्परास, साखळ्या > शृंखला, पांढरा ढग > अभ्रखंड असे येतात. याच कवितेत गरूड, रानपाखरे, रातकिडे यांचे उल्लेख आलेले आहेत. त्यामुळे ढग पांढरा संथ कोपऱ्यात पडून न राहता पिसारा झडलेला पारवा झालेला आहे. हा बदल मूळ आशयास अधिक सघन बनवितो. पुढच्याच कडव्यात 'परि शुक्राचा मोहक तारा निज तेजाने खुलवी अपारा' 'आहुति देण्या हुतात्म्यापरि आलेला पुढती' अशा पहिल्या आवृत्तीत ओळी आहेत. दुसऱ्या आवृत्तीपासून बाराव्या आवृत्तीपर्यंत या ओळी बदलल्या गेल्या आहेत. 'परि शुक्राचा सतेज तारा ! पसरित गगनी प्रकाश धारा ! वीरापरि आत्मार्पण करण्या आलेला पुढती' मोहक > सतेज असे परिवर्तन झाले तसेच नदीतीरावर > नदीतटावर असा बदल तिसऱ्या आवृत्तीपासून झाला आहे.

'सहानुभूती' या कवितेत पहिल्या कडव्याच्या पहिल्या ओळीत दुसऱ्या आवृत्तीपासून बदल झाला आहे.

दोहि बाजूसी हर्म्य गगन भेदी > उभे भवती प्रासाद गगनभेदी, असा बदल झाला आहे. 'खिसा करूनी त्या मोकळा करांत > खिसा ओतुनी त्या भुक्या ओंजळीत' असा बदल झाला आहे. 'सात' या कवितेत 'आगीचे अक्षर एक एक त्यांतील'ऐवजी 'ते कठोर अक्षर एक एक त्यातील' असा दुसऱ्या आवृत्तीपासून बाराव्या आवृत्तीपर्यंत बदल झाला आहे.

'ऋण' कवितेत 'असेल तुम्हि ओतली स्वर- घटांत संजीवनी' दुसऱ्या आवृत्तीपासून 'तुम्ही सतत ओतली स्वर-घटात संजीवनी !' 'शेवटचे पान' कवितेत 'हळुच खोलुनि बन्द कवाडा' 'अलीपरि आलास लबाडा' अशा ओळी पहिल्या आवृत्तीत आहेत. 'घेत सुगंधाचा मागोवा । अलीपरि आलास विलासा' असा पुढे बदल केला आहे.

'उषःकाल' या कवितेत 'पळवु लागला वारा दौलत ती वातावरणी' अशी ओळ पहिल्या आवृत्तीत आहे. दुसऱ्या आवृत्तीपासून 'वाहुं लागला सुगंध वारा तो वातावरणी' (२ ।३) अशा ओळी आल्या आहेत. आशयाचे केंद्रच त्यामुळे बदलून गेले आहे. चौतीसावी कविता पहिल्या आवृत्तीत 'प्रेम' या शीर्षकाने आली आहे. पण पुढे शीर्षक बदलून 'नदीकिनारी' म्हणून आली. 'बंदी' या कवितेत—

*'आणि पुढती ठेविले फळ रसाळ*
*आर्त डोळे पण हेरती आभाळ (१ ।३)*

दुसऱ्या आवृत्तीपासून—

*'पडे पुढती फळ रत्न-पुंज लाल*
*आर्त डोळे पण धुंडतात नीळ*

रसाळ > रत्नपुंज असा संस्कृत शब्द वापरला गेला आहे. पण त्याने अर्थछटा बदलली आहे.

*अभाळातुनि तो कुणी जातभाई*
*चोंच लावुनि चोंचीस तै बसावे*
*नयन रोखून सखयास न्याहळावे*
*दडपलेल्या या कादुनी स्वराला*
*अंतरीचा दाखवावा उमाळा*

दुसऱ्या आवृत्तीपासून वरील पाचही ओळी बदलल्या आहेत. त्या अशा–

*तोच नीलातुनि कुणी जातभाई*
*चोच लावुनी चोंचीस क्षण बसावे*
*नयन नयनाला क्षणभरी मिळावे*
*भावनिर्भर कुजबूज करुनि कांही*
*अन्तरीची ते दाविती व्यथाही*

अभाळातुनि > नीलातुनि, ते > क्षण, एक नयन शब्द गाळला, सखयास हाही शब्द गाळला आहे. आणि संपूर्ण नवीन ओळ तयार केली आहे. पुढच्या दोन ओळीही पूर्णपणाने बदललेल्या आहेत.

'एका कवीस' असे पहिल्या आवृत्तीत अडतिसाव्या कवितेचे शीर्षक होते, पण दुसऱ्या आवृत्तीपासून 'बायरन्' असे आले व बाराव्या आवृत्तीपर्यंत तेच घेतले गेले आहे. या कवितेत पहिल्या कडव्यात चौथ्या ओळीपासून फरक झाला आहे. पहिल्या आवृत्तीत पुढीलप्रमाणे ओळी आहेत :

*भासे वादळ हे विराट असले प्रत्येक ओळीतुनी*
*मेघांच्या शकलांमधून भुरक्या भासे जसा भास्कर*
*शब्दांआडुन भव्य व्यक्ति दिसते उन्मत्त अन् चंचल*

दुसऱ्या आवृत्तीपासून या ओळीत बदल झाला आहे.

*भासे वादळ भव्य उग्र असले त्या गर्व-गीतातुनी*
*अभ्रांच्या शकलांमधून तळपे भासे जसा भास्कर*
*शब्दा आडुनही त्वदंतर दिसे उन्मत्त अन् चंचल !*

विराट > भव्य उग्र, ओळीतुनी > गर्व गीतातुनी, मेघ > अभ्र भुरक्या > तळपे, भव्य व्यक्ति > त्वदंतर असे संस्कृताळलेले शब्द कुसुमाग्रज हेतुपुरस्सर उपयोजिताना दिसतात. त्यापाठीमागे एक विशिष्ट दृष्टी आहे. 'आश्वासन' या कवितेत पहिल्या आवृत्तीत-

*हातांत चांदणी, कां पणतीस्तव झुरतां*
*गगनांत हिमानी तारक होउनि फिरतां (१।२,३/४०)*

दुसऱ्या आवृत्तीपासून 'दशदिशा चांदणे, का पणतीस्तव झुरतां, आकाशपथांतुनि नक्षत्रापरि फिरतां' असा बदल बाराव्या आवृत्तीपर्यंत झाला आहे. अर्थदृष्ट्या येथील शब्दांतर योग्य झाले आहे. कारण हातांत चांदणी > दशदिशा चांदणे असा बदल झाला.

गगन > आकाशपथ, हिमानी > नक्षत्र असे संस्कृत शब्द तर आलेच, पण त्या शब्दांतून ठेका, लय, भारलेपणा साधला गेला. गगन म्हणण्यापेक्षा आकाशपथ हा शब्द अधिक वजनदार होतो. परिणामकारकता वाढविण्याच्या या क्लृप्त्या आहेत.

'ध्यास' या अभंगात 'माझ्या गरिबीत तुझ्यासाठी, खुल्या आभाळात पाखरांचे थवे' अशी ओळ आहे. दुसऱ्या आवृत्तीपासून 'माझ्या जीवनात प्रीति तुझी, निळ्या आभाळात पाखरांचे थवे' असा बदल झाला आहे. गरिबीत > जीवनात, खुल्या > निळया असा बदल झाला आहे. कुसुमाग्रजांच्या कवितेत शब्दबदल होताना एक धोरण स्वीकारलेले दिसते. ते म्हणजे रचनेला मात्रावृत्ताला, जातीरचनेला धक्का लागू नये याची खबरदारी ते घेतात. दुसरे म्हणजे शब्दातील अक्षरसंख्या काटेकोरपणाने जशीच्या तशी स्वीकारतात आणि तिसरे म्हणजे मराठी शब्दांसाठी येणारा तत्सम शब्द वजनदार उच्चारणासाठी प्रभावी ठरणारा असा ते उपयोजितात. उदा. 'कुतूहल' या कवितेत 'कलेकलेने चंद्रासह नवप्रेमहि मावळले' अशी पहिल्या आवृत्तीतील ओळ आहे. दुसऱ्या आवृत्तीत 'चंद्रापरि' असा बदल केला आहे.

'अससि कुठे तू' या कवितेत 'विभवया'च्याऐवजी दुसऱ्या आवृत्तीपासून 'विभवाच्या' असा बदल केला आहे, नि अक्षररचनेचा दोष काढून टाकला आहे.

'टिळकांच्या पुतळयाजवळ' या कवितेतही ओळींमध्ये बदल केलेला आहे.

*१ /१ पुळणीत टेकले होते व्याकुळ शीर*
*१ /४ दाटून अनामिक ये अन्तरि काहूर*
*४ /१ ती उभार यष्टी धीट पहाडी थाट*

पहिल्या आवृत्तीत ओळी आल्या आहेत. पण दुसऱ्या आवृत्तीपासून बदल झाला आहे तो पुढीलप्रमाणे आहे-

*पुळणीत टेकले माथे श्रांत अधीर*
*कल्लोळत अन्तरि काहीतरी काहूर*
*ती कणखर मूर्ती धीट मराठी थाट*

शीर > माथे, व्याकुळ > श्रांत, दाटून > कल्लोळत. अनामिक हा शब्द गाळून टाकला आहे. उभारयष्टी > ती कणखर मूर्ती असा बदल केला आहे. पहाडी थाट > मराठी थाट असा पहाडीच्या ऐवजी मराठी हा शब्द उपयोजिला गेला आहे.

'विशाखा' या काव्यसंग्रहाच्या बारा आवृत्त्यांचा अभ्यास करताना प्रत्येक आवृत्तीत केवळ परिष्करणे झाली आहेत असे दिसून येत नाही. तर विविध पाठभेद निर्माण झाल्याचे निदर्शनास येते. कवीची मूळ संहिता (Text) कशी पन्नास वर्षांत बदलत जाते, त्याचे दिग्दर्शन प्रस्तुत लेखात मांडले आहे. आणि पाठसंशोधन textual criticism ही केवळ प्राचीन ग्रंथांचीच करावी लागते असे नव्हे, तर आधुनिक साहित्याची करता येते, केली पाहिजे. अशा अभ्यासासाठी त्या ग्रंथांच्या आवृत्त्या उपयुक्त ठरतात. लेखकाचे

हस्तलिखित उपलब्ध असले तर अधिक सूक्ष्म अशी विचारांची मांडणी करता येऊ शकते. पण तशी हस्तलिखिते आधुनिक लेखक ठेवतातच असे नाही. मूळ हस्तलिखित ज्या वेळी प्रेसकडे छापण्यासाठी जाते त्या वेळी ते अतिशय जीर्णशीर्ण होऊन गेलेले असते. एका अर्थाने मी वर मांडलेला अभ्यास म्हणजे मुद्रित ग्रंथांच्या आवृत्त्यांचा संहितासमीक्षेचाच अभ्यास ठरतो. आणि संहितासमीक्षेच्या दोन पद्धती पाठसंशोधनशास्त्रात उपयोजिल्या जातात. एक म्हणजे ज्ञेयनिष्ठ (objective) आणि दुसरी म्हणजे ज्ञातृनिष्ठ (subjective) पद्धती होय. प्रस्तुत अभ्यास ज्ञेयनिष्ठ पद्धतीने म्हणजे एक प्रत (आवृत्ती) आधारप्रत म्हणून स्वीकारून प्रतप्रमाणवादी शोध घेतला आहे. 'विशाखा'ची दुसरी आवृत्ती ही आधारप्रत म्हणून स्वीकारून इतर आवृत्त्यांचा तौलनिक विचार केला आहे. पहिली आवृत्ती ही १९४२ मधली होती तर दुसरी आवृत्ती १९४४ मधली आहे. म्हणजे केवळ दोन वर्षांच्या कालखंडात 'विशाखा' संग्रहात खूप परिवर्तने झालेली दिसून येतात. पैकी काही अबुद्धिपुरस्सर बदल झालेले आढळून येतात. ते असे आहेत. (१) ऱ्हस्वदीर्घात शब्दांत झालेले बदल, अक्षर तोडणे आणि अक्षर जोडणे यात झालेले बदल, (२) कवितेच्या रचनेत केलेले बदल– चार ओळींचे कडवे दोन ओळींचे करणे, मुद्रणदोष, समग्र असलेली कविता कडव्यांमधून बांधणे, जातिमात्रावृत्तांच्या नोंदी घालणे-काढणे, पूर्ण तारखा देऊन स्थळ काळाच्या नोंदी देणे, काढून टाकणे, कवितांना क्रमांक देणे, गद्य टिपणातून वर्तमानकालीन शब्दाचे रूप बदलून भूतकालीन रूप तयार करणे, कवितेत बदलत्या लेखन नियमांप्रमाणे बदल करीत जाणे, असे शब्दभ्रंश, वाक्यभ्रंश, पदभ्रंश असे बाह्यांगकारी बदल किंवा प्रमाद दिसून येतात. पण बदल वरवरचे ठरतात. त्यामुळे मूळ आशयाला धक्का लागत नाही. पण बुद्धिपुरस्सर झालेले जे बदल आहेत ते विपुल प्रमाणात दुसऱ्या आवृत्तीत दिसून येतात.

(१) शीर्षकात झालेले बदल 'विशाखा'मध्ये दिसून येतात. एका कवीस > बायरन्, उपसंहार > समिधाच सख्या या !, डम्डम्च्या तुरुंगात > क्रांतीचा जयजयकार ! (२) शब्द लिहिण्याच्या लकबीतही फरक पडलेला दिसतो. (३) ळच्या ऐवजी ल आणि ल च्या ऐवजी ळ वापरण्याची पद्धती, (४) अवतरणचिन्हे काढून शब्द जोडून घेणे, (५) मराठी शब्दांसाठी संस्कृत तत्सम शब्द उपयोजिण्याची पद्धती, (६) ओळींमध्ये परिवर्तन, शब्दांमध्ये उलटापालट, जुन्या ओळी काढून नवीन ओळींची रचना करणे, (७) मराठी शब्दांसाठी हेतुपुरस्सर संस्कृत शब्दांची योजना करणे या बदलांची उपस्थिती दुसऱ्या आवृत्तीपासून अधिक स्पष्ट होत गेली आहे. वर्णविपर्यय, शब्दविपर्यय, शब्दबदल, ओळीबदल, संस्कृत शब्दांचे प्राबल्य असे 'विशाखा'च्या बारा आवृत्त्यांचे पाठसंशोधन सिद्ध करता येते. पैकी दुसरी आवृत्ती ही खरी आधार आवृत्ती ठरते व पुढील आवृत्त्या शास्त्रानुसार भ्रष्ट आवृत्त्या (म्हणजे मुळावरहुकूम नसणे) ठरतात !



अनुक्रमणिका

**टिपणे :**

**विशाखा १**




**'विशाखा'चे एकूण पाच अन्त:प्रवाह वरीलप्रमाणे मांडता येतात. एकूण बारा आवृत्त्या. २**




**(साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व) मुंबई ४०० ०५१.)**

डॉ. र. ना. ठाकूर

# समाजशास्त्रीय समीक्षा : काही विचार

१८ व्या शतकाच्या मध्यास युरोपात व्हॉल्टेअर, रुसो, गिबन या विचारवंतांनी समाजात उदित होणाऱ्या राजकीय जाणिवांचे मूळ सामाजिक जीवनात कसे रुजलेले असते याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला. यातूनच पुढे समाजशास्त्र या विद्याशाखेचा उदय झाला आणि त्यानंतर सामाजिक संस्कृतीचाच एक भाग असलेल्या कलेचे कलास्वरूपशास्त्र आकारत गेले. सामाजिक संस्था या ईश्वरनिर्मित नसून मानवनिर्मित आहेत हा विचार या कलास्वरूपशास्त्राच्या मुळाशी होता.

चित्र, शिल्प, संगीत, नृत्य आणि साहित्य या पाच प्रमुख कलाप्रकारांपैकी साहित्य या कलाप्रकाराची स्वरूपनिश्चिती करणे हे कलाविशारदांना नेहमीच आव्हानात्मक ठरत आले आहे. साहित्य हाही एक कलाप्रकारच असला तरी त्याचे माध्यम (भाषा) हे स्वभावतःच आशययुक्त असून ते मूलतः सामाजिक विनिमयाचे साधन आहे. शब्दांना ते व्यक्त करू पाहत असलेल्या अर्थाखेरीज इतर अनेक अर्थ स्वभावतःच चिकटलेले असतात. साहित्यातील शब्दांबाबतही ते तेवढेच खरे आहे. दुसरे म्हणजे लेखक कोणासाठी तरी लिहीत असतो. "There is always another man in literature : A writer for a reader and a reader for a writer[१]" या सार्त्रच्या आणि "Literature is an expression of society as speech is the expression of man" या बोनाल्डच्या वचनांचा अर्थ हाच आहे. भवभूतीनेही काल निरवधी आहे, पृथ्वी विपुल आहे आणि म्हणून मलाही कधीतरी कोणीतरी समानधर्मा भेटेलच अशी आशा व्यक्त केली होती. म्हणून साहित्याची निर्मिती स्वान्तसुखाय होते असे म्हणणे साहित्याच्या निर्मितिप्रक्रियेविषयी आणि एकूणच साहित्यव्यवहाराविषयी अज्ञान प्रकट करणारे ठरते. कलानिर्मिती ही बाब व्यक्तिगत मानली तरी तिचे आस्वादन, विश्लेषण आणि मूल्यमापन या बाबी समाजात घडत असल्याने सामाजिकच असतात. चित्रशिल्पादी कलांच्या बाबतीतही हा विचार तेवढाच लागू पडतो. कारण त्या कलाही विशिष्ट सामाजिक-सांस्कृतिक पर्यावरणातच जगत, वाढत असतात. तेथेही प्रत्येक कलावंत आपला रसिकवर्ग डोळ्यासमोर ठेवूनच आपली कलानिर्मिती करीत असतो. रसिकांच्या अपेक्षांचा, प्रचलित सामाजिक रूढी-संकेतांचा, अभिरुची-परंपरांचा त्याच्या कलेवर अपरिहार्यपणे परिणाम होत असतो. याच विचारातून समाजशास्त्रीय कलास्वरूपशास्त्राचा (Sociology of Arts) उदय झाला. साहित्याचे

समाजशास्त्र हा समाजशास्त्रीय कलास्वरूपशास्त्राचा एक भाग आहे.

साहित्य आणि समाज यांच्यातील निकट संबंधाचा वस्तुनिष्ठ अभ्यास सर्वप्रथम फ्रान्समध्ये मादाम स्टाइल या विदुषीने केला. इ. स. १८०० मध्ये प्रसिद्ध झालेला त्यांचा 'De la litterature cronsiderce dan ses rapports avec les institutions sociales' हा ग्रंथ समाजशास्त्रीय समीक्षापद्धतीनुसार केलेल्या साहित्याभ्यासाचा मानदंड ठरतो. त्यांनी जर्मन साहित्यातून त्या समाजाच्या राजकीय जाणिवा कशा प्रकारे प्रतिबिंबित झालेल्या आहेत याचे दिग्दर्शन केले असून साहित्य आणि समाज यांचे जवळचे नाते स्पष्ट केले आहे. त्यानंतर हिप्पोलिन तेन यांनी कोणतेही साहित्य म्हणजे देशकालपरिस्थितीचे (Race, Moment & Miliue) अपत्य असते हा विचार मांडून त्या परिप्रेक्ष्यात (perspective) इंग्रजी साहित्याचा इतिहास लिहिला (१८६४).

फ्रान्समध्ये जन्मलेला हा विचार इंग्लंड, अमेरिका इत्यादी देशांत झपाट्याने पसरला आणि विकसित झाला. आज त्या देशांमध्ये समाजशास्त्रीय समीक्षेच्या समृद्ध ज्ञानशाखा विस्तारल्या आहेत.

मार्क्सवादी समीक्षेत समाजशास्त्रीय साहित्यसमीक्षेची मोठी परंपरा आहे. विशेषतः ल्युशिअन गोल्डमन यांचा उल्लेख न करता पुढे जाणे चुकीचे ठरेल. त्यांनी जॉर्ज ल्युकाच यांच्या विचारांची पार्श्वभूमी घेऊन आपल्या वैकासिक रचनावादाची (Gerctic structuralism) मांडणी केली असून साहित्य आणि समाजजीवन यांचा जन्यजनक संबंध दाखवून दिला आहे.

साहित्य आणि समाज यांच्यातील परस्परसंबंधाचा अभ्यास करण्याची समाजशास्त्रज्ञांनाही तेवढीच आवश्यकता वाटते हे येथे लक्षात घेणे आवश्यक आहे. उदा. १९५४ मध्ये अमेरिकन सोशिऑलॉजिकल असोसिएशनच्या वार्षिक बैठकीत Sociology of Art या विषयावर एक परिसंवाद आयोजित करण्यात आला होता. [२] आता तर या स्वरूपाचा अभ्यास हा त्यांच्या नेहमीच्या कार्याचा एक भाग होऊन बसला आहे. त्याचप्रमाणे सौंदर्यमीमांसकांनाही या विषयासंबंधी आस्था निर्माण झाली आहे. स्वीडनमध्ये आयोजित करण्यात आलेल्या (१९६८) 'इंटरनॅशनल काँग्रेस ऑफ इस्टेटिक्स' च्या सहाव्या अधिवेशनात Art and Society या विषयाचा समावेश करण्यात आलेला होता. [३]

कोणत्याही समाजात भौतिक आणि अभौतिक अशी द्विस्तरीय स्वरूपाची संस्कृतिव्यवस्था नांदत असते. साहित्यव्यवस्था हा त्या समाजाच्या अभौतिक संस्कृतिव्यवस्थेचा एक भाग असतो. त्यामुळे त्या समाजाच्या भौतिक आणि अभौतिक संस्कृतिव्यवस्थेचा संदर्भ टाळून साहित्याचा अभ्यास करता येत नाही.

प्रत्येक लेखक कुठल्या तरी साहित्यप्रकारात लेखन करीत असतो. प्रत्येक



अनुक्रमणिका

साहित्यप्रकार हा साहित्यव्यवस्थेचा भाग असतो, आणि साहित्यव्यवस्था ही समाजाच्या संस्कृतिव्यवस्थेचे अपरिहार्य अंग असते. साहित्याच्या आणि एकूणच साहित्यव्यवहाराच्या पर्यायी आकलनासाठी ही सोपान-परंपरा डोळ्यासमोर ठेवणे आवश्यक ठरते.

समाजातील इतर व्यक्तींप्रमाणे लेखक हाही त्या समाजाचा अविभाज्य घटक असतो. किंबहुना तो अधिक जागरूक व जबाबदार घटक असतो. व्यक्ती म्हणून तो जे अनुभव घेतो आणि आपल्या साहित्यकृतीत व्यक्त करू पाहतो ते त्याला मूलतः समाजाने दिलेले असतात. त्याच्या अभिव्यक्तीचे माध्यम असलेली भाषा ही तर सामाजिक विनिमयाची ध्वनिरूप व्यवस्थाच आहे. व्यक्तीला आपले अनुभव किंवा जे काही सांगावेसे वाटते, ते भाषारूपाने व्यक्त करावेसे वाटते ही घटनाच मुळी सामाजिक आहे. कारण अवतीभोवती काही सामाजिक वातावरण असल्याशिवाय लेखकाला ही प्रेरणाच मिळू शकणार नाही. तो जितक्या सहजपणे आपल्या इतर जैविक गरजा भागवितो तेवढ्याच सहजपणे भाषारूपाने अभिव्यक्त होण्याची आपली मानसिक गरज भागवितो. मानवाच्या या गरजेतच साहित्यादी कलांचे मूळ आहे. लेखकाला त्याचे व्यक्तित्व, अनुभव आणि भाषा या गोष्टी समाजानेच दिल्या आहेत. म्हणूनच व्यक्ती म्हणून लेखकाने वेगळे व्यक्तित्व प्रस्थापित करण्याचा आणि त्यानुषंगाने साहित्यकृतींची अनन्यसाधारणता सिद्ध करण्याचा प्रयत्न होत असला तरी साहित्यव्यवहार ही बाब समाजसापेक्षच राहते हे सत्य नाकारता येत नाही. प्रत्येक साहित्यिक कुठल्यातरी साहित्यप्रवाहात लेखन करीत असतो. त्या त्या साहित्यप्रकारात लेखन करताना त्या साहित्यप्रकारांचे रचनासंकेत त्याने स्वतःच स्वतःवर लादून घेतलेले असतात. म्हणूनच साहित्यकृतीचे वर्गीकरण, मूल्यमापन या प्रक्रिया शक्य होतात. लेखकाने वाचकांच्या अपेक्षांचे व साहित्यव्यवस्थेचे ठेवलेले हे भान म्हणजेच वाचकांचा व समाजाचा साहित्यनिर्मितीतील सहभाग होय. साहित्यनिर्मितीत समाज सहभागी होतो तो या अर्थाने. हा सहभाग अप्रत्यक्ष व दूरान्वयी असेल, परंतु तो नाकारता येत नाही.

साहित्याच्या सामाजिकतेचा अभ्यास करताना कलावंताच्या वेगळ्या व्यक्तिवैशिष्ट्याचा, सहभागाचा विचार करावा लागेल; परंतु तो करताना त्याला अनन्यसाधारणत्व देऊन चालणार नाही. कारण कलावंतांच्या व्यक्तिगत जाणिवेतून शेवटी समाजाचीच जाणीव व्यक्त होत असते, असे जॉर्ज ल्युकाचने म्हटले आहे, ते येथे लक्षात ठेवले पाहिजे. असे होत नसेल तर त्या व्यक्तित्वाचा व त्याच्या साहित्यनिर्मितीचा वेगळा अन्वयार्थ लावावा लागतो.

साहित्याची निर्मिती, आस्वाद, विश्लेषण, मूल्यमापन, प्रकाशन, वितरण या सर्व बाबी मानवनिर्मित समाजव्यवस्थेतच शक्य आहेत. असे असताना साहित्यव्यवहाराची समाजसापेक्षता नजरेआड करून कसे चालेल? "Literary phenomenon is












fundamentaly social"[४] असे सार्त्रने निःसंदिग्धपणे सांगितले आहे (एवढेच नव्हे, तर तो म्हणतो, Writing without reading is nonsensc). थोडक्यात, साहित्यव्यवहार (निर्मिती, आस्वाद आणि तत्संबंधी इतर अनेक बाबी) ही एक सामाजिक-सांस्कृतिक घटना (sociocultural fact) आहे हे स्पष्ट आहे. म्हणूनच साहित्याच्या आकलनासाठी, साहित्यव्यवहाराशी निगडित असलेल्या अनेक बाबींचा अभ्यास करण्यासाठी समाजशास्त्रीय समीक्षापद्धतीचा अवलंब करणे आवश्यक ठरते.

समाजशास्त्रीय समीक्षा साहित्यव्यवहाराशी संबंधित असलेले अनेक विषय सामावून घेते. प्रथम हे लक्षात घेतले पाहिजे की, समाजशास्त्रीय समीक्षा साहित्यकृतीचे कलात्मक मूल्यमापन करण्याचा दावा करीत नाही. ही समीक्षा मुख्यतः वर्णनाचे, स्पष्टीकरणाचे कार्य करते. उदा. एखादी विशिष्ट साहित्यकृती किंवा एखादा विशिष्ट साहित्यप्रकार विशिष्ट काळातच का जन्मला, फोफावला, त्याने ठराविक असे स्वरूप का धारण केले याचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न ही समीक्षा करते. एकंदरीत साहित्यव्यवहार आणि समाज यांच्यातील परस्परसंबंध शोधण्याचा, त्यांचे अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न समाजशास्त्रीय समीक्षा करते. यात समाजाचा साहित्यावर होणारा परिणाम आणि साहित्याचा समाजावर होणारा परिणाम अशा दोन बाजू असल्या तरी पहिल्या बाजूवर अधिक भर दिला जातो आणि तसा तो देण्यात आला आहे असे या समीक्षेच्या इतिहासावरून दिसून येते. समाजशास्त्रीय समीक्षेचे प्रयोजन स्पष्ट करताना गो. म. कुलकर्णी लिहितात, "समाजरचनेचे घटक आणि साहित्यसंरचनेचे घटक यांचे अन्योन्यसंबंध स्पष्ट करणे, हे समाजशास्त्रीय साहित्यसमीक्षेचे प्रमुख प्रयोजन आहे. साहित्यिकाची मूळ प्रकृती, त्याची कलाप्रेरणा, त्याच्या युगाने त्याच्यापुढे उभ्या केलेल्या सांस्कृतिक समस्या, विशिष्ट युगात विशिष्ट आशयाला किंवा आविष्कारपद्धतींला आलेले महत्त्व, निर्मित साहित्याचा समाजमनावर होणारा परिणाम, साहित्याकडे पाहण्याचा तत्कालिनांचा दृष्टिकोन, त्यांची समीक्षामूल्ये, वाचकांची व एकंदर वाङ्मय व्यवहाराची स्थितीगती, तत्कालीन जीवनदृष्टी, परंपरा, आचारविचारपद्धती या सर्वांचाच विचार समाजशास्त्रीय समीक्षेत अभिप्रेत असतो. समाजशास्त्राला महत्त्वाच्या वाटणाऱ्या विविध अंगांच्या दृष्टीने साहित्याचा विचार ही समीक्षा करते. समाजशास्त्रीय समीक्षेचे प्रथम आणि महत्त्वाचे काम म्हणजे एकंदर कलाव्यवहार विशिष्ट समाजाच्या संरचनेशी, तीतील विविध सांस्कृतिक घटकांशी कसा आणि कोणकोणत्या प्रकारे संबंधित आहे हे स्पष्ट करणे, हे असते."[५]

साहित्याचा समाजावर कसा आणि कोणत्या स्वरूपाचा परिणाम होतो हे निश्चित सांगता येत नसले तरी आणि म्हणूनच ही बाब वादग्रस्त ठरविण्यात येत असली तरी साहित्याचा समाजावर परिणाम होत असतो हे नाकारता येत नाही. तशी उदाहरणेही आपण दाखवून देऊ शकतो.

समाज आणि साहित्य यांच्या परस्परसंबंधाचा अभ्यास हे समाजशास्त्रीय समीक्षेचे उद्दिष्ट असल्याने या अभ्यासात इतर काही उपयोजित अभ्यासपद्धतींचाही समावेश होतो. उदाहरणार्थ, समाजाच्या अभ्यासासाठी साहित्यकृतींचा दस्तऐवज (Document) म्हणून उपयोग करणे, समाजातील वैचारिक जाणिवांच्या स्थितीगतीचे चित्र वाङ्मयाधारे शोधणे, लेखकांची सामाजिक भूमिका अभ्यासण्यासाठी त्यांच्या साहित्यकृतींचा मागोवा घेणे, वाङ्मयात प्रतिबिंबित झालेल्या सामाजिक जाणिवांचा व प्रश्नांचा आढावा घेणे, त्यांचे स्वरूप शोधणे इत्यादी. उपरोक्त स्वरूपाच्या अभ्यासाचे प्रयोजन मूलतः समाजशास्त्रीय आहे. साहित्यव्यवहाराची समाजमूलकता तेथे गृहीतच धरलेली आहे. याचा अर्थ येथे साहित्यकृतींचे कलारूप हेतुतः दुर्लक्षिण्यात येत असते असा मात्र नाही. साहित्य हे शेवटी एक कलारूप आहे हे या अभ्यासकाला मान्यच असते; तथापि त्याला भर द्यावयाचा असतो तो त्या साहित्यकृतींच्या सामाजिक पैलूंवर.

साहित्य आणि समाजजीवन यांच्या अन्योन्य संबंधाची जाणीव मराठी समीक्षकांना आणि लेखकांना होती; परंतु त्याची सैद्धांतिक मांडणी करण्याचा प्रयत्न झाला नाही. राजवाडे, केतकर यांच्या लेखनातून हा प्रत्यय येतो; परंतु त्यासंबंधीचा तात्त्विक विचार त्यांनी मांडला नाही. मराठीत असा पहिला प्रयत्न 'साहित्य आणि समाजजीवन' (१९३५) या पुस्तकाच्या रूपाने लालजी पेंडसे यांनी केला. मार्क्सवादी समीक्षापद्धतीचा आणि साहित्य व समाजजीवन याच्या अन्योन्य संबंधांचा निकराने पाठपुरावा करणारा हा ग्रंथ उल्लेखनीय ठरतो. दि. के. बेडेकर (विचारयात्रा), शरच्चंद्र मुक्तिबोध (जीवन आणि साहित्य) यांच्या लेखनातून एतद्‌विषयक स्फुट विचार व्यक्त झाले आहेत. तथापि त्यांनीही समाजशास्त्रीय दृष्टीने सैद्धांतिक मांडणी केलेली नाही. अलीकडे रा. ग. जाधव (साहित्य आणि सामाजिक संदर्भ) यांनी या संदर्भात काही विचार मांडले आहेत. अनिल सहस्रबुद्धे यांनी मार्क्सवादी दृष्टिकोनातून या विषयाचा ऊहापोह केला आहे. (साहित्य आणि समाज). परंतु मराठी वाचकांना समाजशास्त्रीय समीक्षापद्धतीचा वस्तुनिष्ठ परिचय गो. म. कुलकर्णी यांनीच करून दिला असे म्हणावे लागेल (मराठी साहित्यातील स्पंदने, १९८५). मराठी समीक्षेला समाजशास्त्रीय समीक्षापद्धतीचा परिचय होत आहे; परंतु साहित्याभ्यासात तिचे उपयोजन झाल्याचे फारसे दिसत नाही. या संदर्भात अंजली सोमण यांनी या दृष्टीने केलेला स्त्रियांच्या आत्मचरित्रांचा अभ्यास हे एक उदाहरण ठरावे (साहित्य आणि सामाजिक संदर्भ).

तंत्रनिष्ठ कलावादाच्या सर्वंकष प्रभावामुळे मराठी साहित्यचर्चेत साहित्य आणि समाजजीवन यांच्यातील परस्परसंबंधाचा अभ्यास करू पाहणे वाङ्मयबाह्य आणि प्रसंगी प्रचारात्मक ठरविण्यात आले. कलेसाठी कला की जीवनासाठी कला असले बिनबुडी वाद लढविले जात होते त्याच काळात साहित्य आणि समाजजीवन त्यांच्या अन्योन्य संबंधाची चिकित्सा करणारा लालजी पेंडसे यांचा उपरोक्त ग्रंथ उपेक्षित राहिला.



अनुक्रमणिका

परंतु आता परिस्थिती बदलली आहे. स्वातंत्र्योत्तर काळातील अनेकविध स्थित्यंतरांचे पडसाद वाङ्मयातही उमटत आहेत. नव्याने उदयास आलेल्या साहित्यचळवळींमुळे साहित्य-संस्कृतीतील वातावरण ढवळून निघाले आहे. परिणामी साहित्याभ्यासाच्या रूढ पद्धतींची अपर्याप्तता जाणवू लागली असून साहित्याभ्यासाच्या इतर पद्धतींनाही तेवढीच मान्यता मिळू लागली आहे. त्यात समाजशास्त्रीय समीक्षापद्धतीचाही समावेश होतो. विशेषतः दलित साहित्याच्या मूल्यमापनासाठी सामाजिक-मानववंशशास्त्रीय (Social Anthropological) दृष्टिकोन स्वीकारला पाहिजे, अशी भूमिका घेण्यात आली आहे.

साहित्यकृतीचे आणि एकूणच साहित्यव्यवहाराचे सर्वांगीण आकलन व्हावयाचे असेल तर साहित्यकृतीच्या बाहेर गेले पाहिजे; म्हणजे ती साहित्यकृती ज्या समाजात निर्माण झाली तेथे तिची पाळेमुळे शोधली पाहिजेत, हे समीक्षकांना पटू लागले आहे. येथे साहित्यसमीक्षेच्या केवळ कलावादी आणि रूपवादी भूमिकेची अपर्याप्तता लक्षात येते. एवढेच नव्हे, तर या भूमिकांच्या अतिरिक्त आग्रहाचा अन्वयार्थही समाजशास्त्रीय दृष्टिकोनातून लावता येतो.

मध्ययुगीन साहित्याच्या अभ्यासासाठी समाजशास्त्रीय अध्ययनपद्धतीचा पुरस्कार करताना डॉ. सदानंद मोरे लिहितात, "साहित्यकृती हे एक स्वतंत्र आणि स्वायत्त 'युनिट' मानून तिच्या आतूनच तिचा अभ्यास करणे ही एक पद्धत आहे व ती आवश्यकही आहे. परंतु साहित्यकृतींचे संपूर्ण आकलन तिच्या रचनाकक्षा न ओलांडता अंतर्गततया होईल हा आग्रह अनाठायी आहे. खरे म्हणजे साहित्यकृतीच्या बाहेर जाऊन केलेला अभ्यास हा काही साहित्यस्वायत्ततेला बाधा आणणारा असतो हे मानणे चुकीचे आहे. उलट अशा अभ्यासाने तिच्या आकलनास, आस्वादास आणि पर्यायाने समीक्षेलाही मदतच होईल."[६]

गंगाधर पाटील, कलाकृतीच्या मूल्यमापनासाठी तिच्या आंतररचनेबरोबरच ती ज्या सांस्कृतिक पर्यावरणात निर्माण झाली त्याचाही विचार केला पाहिजे, असा विचार मांडताना दिसतात.[७] रूपनिष्ठ समीक्षेने साहित्यकृतीच्या शब्दरूपाला (Text) महत्त्व दिले असले तरी आस्वादाची रसिकसापेक्षता नाकारलेली नाही. आदिबंधनिष्ठ समीक्षेची भूमिका समाजशास्त्रीय समीक्षेस पूरकच ठरते. आदिबंधनिष्ठ समीक्षेची साहित्यकलेविषयीची भूमिका स्पष्ट करताना गंगाधर पाटील लिहितात, "साहित्यकृती ही समग्र साहित्यसृष्टीचे एक अंग आहे आणि पुन्हा साहित्यसृष्टी ही विशिष्ट संस्कृतीचे एक अंग असते असे मानून समीक्षकाने साहित्यकृतींचे सौंदर्यग्रहण व मूल्यमापन केले पाहिजे, अशी आदिबंधनिष्ठ समीक्षेची साहित्यकृतीकडे पाहण्याची दृष्टी आहे."[८]

त्याचप्रमाणे वास्तववादी, शैलीवैज्ञानिक, मानसशास्त्रीय इत्यादी समीक्षापद्धती समाजशास्त्रीय समीक्षेस साहाय्यभूत ठरतात. किंवा वेगळ्या शब्दात असेही म्हणता येईल की, समाजशास्त्रीय समीक्षापद्धती उपरोक्त पद्धतींना व्यापून राहते, त्यांनाही अपल्या विस्तृत

कक्षेत सामावून घेते.

मराठी साहित्याच्या अभ्यासासाठी आणि चिकित्सक समीक्षेसाठी समाजशास्त्रीय समीक्षापद्धतीची उपयुक्तता निर्विवाद आहे.

आधुनिक काळातील हरिभाऊ आपटे, फडके, खांडेकर इत्यादी लेखकांच्या साहित्याचे पर्याप्त मूल्यमापन होण्यासाठी ही समीक्षापद्धती साहाय्यभूत ठरू शकते. त्याचप्रमाणे फुले, भालेकर, डॉ. आंबेडकर, डॉ. केतकर यांच्या साहित्याची तीव्र उपेक्षा का झाली याची समाजशास्त्रीय स्पष्टीकरणे शोधण्यास ही समीक्षादृष्टी उपकारक ठरू शकते.

आज मराठी साहित्यात दलित आणि ग्रामीण साहित्याचे प्रवाह स्थिरपद झालेले आहेत. त्यांच्या स्वरूपविवेचनात आणि विश्लेषणमूल्यमापनात उलट-सुलट मतप्रवाह आढळून येतात. हे साहित्यप्रवाह उदयास का आले याची समाजशास्त्रीय चिकित्सा होणे आवश्यक आहे. दलित साहित्याचा विरोध कोणत्या व्यवस्थेला आहे, त्या साहित्यिकांना कोणती समाजव्यवस्था आणि मूल्यव्यवस्था अभिप्रेत आहे हे लक्षात घेऊन त्यांच्या विद्रोहाचा अर्थ लावला पाहिजे. एकतर अवास्तव स्तुती किंवा अनुल्लेख हा प्रकार दलित साहित्याबाबत का घडतो आहे? दलित साहित्यापाठोपाठ ग्रामीण साहित्याची चळवळ उदयास का यावी आणि दलित साहित्याचे स्वागत झाले असले तरी ग्रामीण साहित्यचळवळीस विरोध का व्हावा? दलित, जनवादी, ग्रामीण या साहित्यचळवळी वेगळ्या मानदंडाची अपेक्षा का करीत आहेत? त्याच वेळी कळतनकळत रूढ मानदंडांचाच अंगीकार या चळवळीतील लेखकांनी केला आहे का? त्यांचे खरे आवाहन कोणासाठी आहे? म्हणजे कोणता वाचकवर्ग डोळ्यासमोर ठेवून ते लिहिले जात आहे? त्याचे प्रयोजन सामाजिक, की केवळ वाङ्मयीन? आकलन-आस्वादन-मूल्यमापन या संदर्भात त्यांनी कोणते नवे प्रश्न उपस्थित केले आहेत? या चळवळींमुळे एकूणच वाङ्मय व्यवहारावर (प्रकाशन, अभिरुची यासह) कोणता परिणाम झाला आहे? स्थितीवादी व रंजनवादी साहित्यनिर्मितीच्या सर्वंकष लाटेत परिवर्तनवादी साहित्याची पीछेहाट होत आहे का? यात प्रसारमाध्यमे, प्रकाशनसंस्था यांचा सहभाग किती व कोणता? असे अनेक प्रश्न उपस्थित होतात. त्यांची चर्चा-चिकित्सा समाजशास्त्रीय भूमिकेतूनच शक्य आहे.

वाङ्मयाशी आणि वाङ्मयीन संस्कृतीशी संबद्ध असलेल्या अनेक प्रश्नांची पाळेमुळे आपल्या सामाजिक रूढीपरंपरा आणि धारणांमध्येच कशी रुजलेली आहेत याचा शोध घेणे हे समाजशास्त्रीय समीक्षेचे उद्दिष्ट ठरते. उपरोक्त प्रश्नांची काही प्रमाणात चर्चा झाली आहे. परंतु तिला पुरेशी सैद्धांतिक बैठक लाभलेली नाही. हे प्रश्न वाङ्मयबाह्य आहेत, अशी सोवळी आणि मतलबी भूमिका घेऊन त्यांचा विचार टाळता येणार नाही.

साहित्यिक संस्कृतीशी संबंधित असलेल्या अशा अनेक बाबींचा ऊहापोह व्हावयास हवा आहे. या बाबींची समाधानकारक उत्तरे समाजशास्त्रीय समीक्षापद्धतीच शोधू शकते.



अनुक्रमणिका

आज वाङ्मयीन संस्कृतीतील वातावरण अक्षरशः ढवळून निघालेले असताना आणि साहित्याभ्यासाच्या रूढ पद्धती अपर्याप्त ठरलेल्या असताना इतर अनेक समीक्षापद्धतींना समावून घेणारी समाजशास्त्रीय समीक्षापद्धतीच लाभदायक ठरू शकेल असे वाटते.

संदर्भ

१. International Encyclopedia of Social Sciences, Volume No. 9, Sociology of Literature (Robert Escarpit), page no. 447

२. Albrecht Milton C., Barnet James H., Griff Mason : Sociology of Art and Literature, Duckworth Publishers, London, Second Impression 1982, Preface-page No. X.

३. Ibid.

४. International Encyclopedia of Social Sciences, Ibid.

५. कुलकर्णी, गो. म. : मराठी साहित्यातील स्पंदने, सुपर्ण प्रकाशन पुणे, आवृत्ती पहिली १९८५, पृ. १७-१८

६. मोरे, सदानंद : मध्युगीन साहित्याची समाजशास्त्रीय अध्ययनपद्धती, भारतीय मराठी अभ्यास परिषद, अधिवेशन ३ रे धुळे, येथे वाचलेला निबंध, पृ. ३.

७. पाटील गंगाधर : अनुष्टुभ, जुलै-ऑगस्ट १९९०, पृ. १२.

८. पाटील, गंगाधर : समीक्षेची नवी रूपे, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई, आवृत्ती पहिली, १९८१, पृ. ७३.

(४२, आम्रपाली, रंकाळा पार्क, कोल्हापूर)

## मराठी नाट्यकोशासाठी माहिती पाठवा

मराठी नाटक आणि रंगभूमी यांच्या संदर्भातील नाटककार, कलाकार, तंत्रज्ञ, समीक्षक, व्यवस्थापक, नाट्यगृहे, ग्रंथलेखक इत्यादींची माहिती असलेला नाट्यकोश तयार करण्याचे काम सुरू झाले आहे. वैयक्तिक स्तरावर माहिती मिळविण्याचे प्रयत्न चालू आहेतच, पण ज्यांनी अद्याप ही माहिती पाठवली नसेल त्यांनी त्वरित पत्रव्यवहार करून आवश्यक ती माहिती पाठवावी. अशा तऱ्हेचा नाट्यकोश मराठीत प्रथमच होत असल्याने तो अचूक होण्यासाठी सहकार्य करावे अशी विनंती.

संपर्क : डॉ. वि. भा. देशपांडे, मॉडर्न महाविद्यालय, शिवाजीनगर पुणे ४११ ००५



अनुक्रमणिका






डॉ. नीलिमा गुंडी

# 'गोल्डन ट्रेझरी' आणि आधुनिक मराठी कविता

'गोल्डन ट्रेझरी' (१८६१) हे पुस्तक म्हणजे इंग्रजी भाषेतील उत्कृष्ट गीते व भावकविता यांचे फ्रान्सिस टर्नर पालग्रेव्ह यांनी केलेले संकलन होय. मुळात या पुस्तकाची विभागणी चार भागांत केलेली आहे. (या पुस्तकाच्या अनेक आवृत्ती निघाल्या असून १९६४ च्या आवृत्तीत पाचवा भाग समाविष्ट झालेला आहे. येथे त्याचा विचार कालदृष्ट्या अप्रस्तुत म्हणून टाळला आहे.) शेक्सपिअर ते वर्डस्वर्थ दरम्यानच्या अनेक इंग्रजी कवींच्या कवितांचा यात समावेश आहे.

आधुनिक मराठी कवितेच्या जडणघडणीच्या संदर्भात 'गोल्डन ट्रेझरी' हे पुस्तक फार महत्त्वाचे ठरते. आधुनिक मराठी कवितेतील 'आधुनिकते'चा धागा इंग्रजी कवितेच्या संस्कारांशी संबंधित आहे; हे सर्वश्रुतच आहे. हा संबंध उलगडून पाहण्यासाठी 'गोल्डन ट्रेझरी'चा सखोल विचार होणे आवश्यक आहे. प्रस्तुत पुस्तक त्या काळी अभ्यासक्रमात नेमलेले असे. त्यामुळे त्यातील कवितांनी एकप्रकारे आपल्याकडील नवशिक्षितांच्या काव्याभिरुचीचे पोषण केले आहे. यात कवितांची निवड करताना निकष आहे तो असा : "Lyrical has been here held essentially to imply that each poem shall turn on some single thought, feeling or situation" (Preface)

**महाजनि ते ज्युलियन :** केशवसुतपूर्वकालीन कालखंडात वि. मो. महाजनि यांच्या 'कुसुमांजलि' (१८८५) या इंग्रजी कवितांच्या भाषांतरसंग्रहाला मराठी वाङ्मयेतिहासात महत्त्वाचे स्थान दिलेले आहे. यात भाषांतरासाठी निवडलेल्या इंग्रजी कवितांपैकी जवळजवळ निम्म्या (४१ पैकी १९) कविता 'गोल्डन ट्रेझरी'तील आहेत. महाजनींनी इंग्रजी कविता भाषांतरित करताना आर्या, साकी, दिंड्या, स्तोत्र, कटाव असे बाह्यरूप योजल्यामुळे आणि संस्कृतप्रचुर शैली वापरल्यामुळे त्यांतील नावीन्य मात्र फारसे मुखरित झाले नाही. तरीही त्यांनी मराठी कवितेचे लक्ष वेगळ्या दिशेला वळविले, हे ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचे ठरते. ह्यानंतर 'आधुनिक कवितेचे जनक' म्हणून मान्यता मिळालेल्या केशवसुतांच्या कवितेवरही 'गोल्डन ट्रेझरी'चा प्रभाव आहे. केशवसुतांनी 'गोल्डन ट्रेझरी' तील काही कविता भाषांतरित केल्या आहेत. (त्यांची शीर्षके आहेत– 'मरणकाल', 'मदन आणि मदनिका', 'काल आणि प्रियेचे सौंदर्य') तसेच काही कविता रूपांतरितही केल्या आहेत. (प्रा. भ. श्री. पंडित संपादित 'समग्र केशवसुत' (१९६१) या पुस्तकात केशवसुतकृत

भाषांतर-रूपांतरांचा सविस्तर विचार आलेला आहे.)

केशवसुतांच्या नंतरच्या पिढीतील महत्त्वाचे कवी माधव ज्युलियन यांच्या काव्यदृष्टीवरही 'गोल्डन ट्रेझरी'चा ठसा जाणवतो. ज्युलियनांच्या 'विरहतरंग' (१९२६) मध्ये 'गोल्डन ट्रेझरी' चा निर्देश 'हैम कोश' असा खास ज्युलियनी शैलीने मराठीकरण करून आलेला आहे. प्रेमकाव्य लिहिताना 'हैमकोशा'तून स्फूर्ती शोधण्याची 'विरहतरंग' च्या नायकाची वृत्ती तत्कालीन वस्तुस्थितीचेही एक प्रकारे निदर्शन करते.

ज्युलियनांनी 'स्वप्नरंजन' (१९३४) मध्ये 'गोल्डन ट्रेझरी' तील तीन कवितांची भाषांतरे केली आहेत आणि त्यांपैकीच एका कवितेचे त्यांनी इंग्रजीत केलेले विडंबन फर्ग्युसन कॉलेज मॅगेझिनमध्ये प्रसिद्ध झाले आहे.[१] 'स्वप्नरंजन' मध्ये ज्युलियनांनी भाषांतर करताना निर्देशिलेले कवितांचे क्रमांक जे. एच. फोलरने संपादित केलेल्या 'गोल्डन ट्रेझरी'शी जुळतात. फोलरने संपादित केलेल्या आवृत्त्या (भाग १,३,४) १९०१ ते १९०३ च्या दरम्यान मॅकमिलन अँड कंपनी, लंडनतर्फे प्रसिद्ध झाल्या असून त्यात विद्यार्थ्यांसाठी उपयुक्त अशा टीपांचा समावेश आहे.

'गोल्डन ट्रेझरी'मधील अनेक कविता वाचताना आधुनिक मराठी कवितेला त्यातून कसकशी प्रेरणा व दिशा मिळाली असेल, याचा शोध घ्यावासा वाटतो. (हा शोध अर्थातच काही मर्यादेपर्यंतच घेता येतो.) मराठी कविता कोठे, कशी व का वेगळी झाली, याचाही अंदाज बांधता येतो. प्रस्तुत लेखात इंग्रजी-मराठी कवितांतील भाषांतरे, रूपांतरे तपासण्याची भूमिका नाही. येथे फक्त भावविश्व, प्रतिमासृष्टी आणि अभिव्यक्ती या बाबतीत दोहोंत असलेले साधर्म्य अधोरेखित करण्याचा प्रयत्न आहे.

(१) **प्रेमभाव** : 'गोल्डन ट्रेझरी' मध्ये प्रेमभाव व्यक्त करणाऱ्या अनेक सुंदर कविता आहेत. प्रेम ही मर्त्य जीवन अर्थपूर्ण करणारी एक दिव्य शक्ती असल्याची जाणीव, त्यातील काही कवितांमधून व्यक्त झाली आहे. उदा. कोलरिजची 'Love', शेक्सपिअरची 'True Love' या कविता. इंग्रजी कवितांमुळे मराठी कवींना एक प्रकारे प्रेमभावनेचा आधुनिक दृष्टीने साक्षात्कार झाला, असे म्हणता येते. उदा. गोविंदाग्रजांची 'प्रेमाखातर', भा. रा. तांबे यांची 'प्रेममाहात्म्य' या कविता प्रेमभावनेची थोरवी गातात. तत्कालीन वातावरणातील सांस्कारिक दडपणांमुळे प्रत्यक्ष प्रेमानुभव व्यक्त करणाऱ्या कविता मात्र खूपच कात टाकून सामोऱ्या येतात. ज्युलियनांच्या 'विरहतरंग' (१९२६) मध्ये याचे स्पष्टपणे प्रत्यंतर येते. त्यात 'हैमकोशा'तील कवितांतून स्फूर्ती घेऊन नायकाने लिहिलेल्या प्रेमकवितेचा उल्लेख आला आहे. तो असा.[२] 'ओढे हे मिळती नदीस कविता आणूनि भाषान्तरी, राधेला विनवीत ये हरि असा प्रस्ताव मी त्या करी' पी. बी. शेली यांच्या 'Love's Philosophy' या सुप्रसिद्ध कवितेला मराठी रूप देताना मुळातील नैसर्गिक प्रेमभावनेला (The Fountains mingle with the river) कृत्रिम आध्यात्मिक वळण (राधेला विनवीत ये हरि) कसे द्यावे लागते,

याविषयीची वस्तुस्थितीच यातून सूक्ष्म उपरोधासकट प्रकट होते.

'गोल्डन ट्रेझरी' मधील प्रेमानुभव व्यक्त करणाऱ्या काही कवितांमध्ये सौंदर्यापेक्षा संवेदनशील हृदयाला– भाव-संवादाला अधिक महत्त्व दिले आहे. जी. डार्ली यांच्या 'The loveliness of Love' या कवितेतील पुढील ओळींतून याची खात्री पटते :

*"Give me, instead of Beauty's bust*
*A tender heart, a loyal mind*
*One in whose gentle bosom I*
*could pour my secret heart of woes"*

(Book II, Page 75) या ओळी वाचताना गोविंदाग्रजांच्या 'ती कोण ?' मधील पुढील ओळी अपरिहार्यपणे आठवतात :

*"ओठांशी भिडतें रहस्य मनिंचे सांगू कुणाला परी ?*
*अश्रू हे नयनींही माळ करुनी घालू कुणाच्या गळां ?*
*आलें हे भरुनी रितें हृदयही देऊं कुणाच्या करीं ?*
*आला दाटुनि कंठ हाय ! रडुनी कोठें करूं मोकळा ?" (पृष्ठ. ७५)*

बंधने झुगारू इच्छिणाऱ्या प्रेमामागील अनावर नैसर्गिक ऊर्मी व्यक्त करताना इंग्रजी कवितांत येणारी निसर्गातील प्रतिमांची योजना व प्रश्नालंकारयुक्त शैली, या अभिव्यक्तिविशेषांचा ठसादेखील मराठी कवितेवर उमटलेला दिसतो. उदा. शेलीच्या एका कवितेतील या ओळी पाहा : (Book IV, Page 202) "The desire of the moth for the star of the night for the morrow," तसेच त्यांच्याच 'Love's Philosophy' मधील आशय व शैली यांचा सूक्ष्म प्रभाव गोविंदाग्रजांच्या 'ती कोण ?' या कवितेवर दिसतो. 'रात्रीमागुनि धावतो दिवसही, कीं भेट व्हावी कुठे ?' या ओळीचे वर उद्‌धृत केलेल्या ओळीशी असलेले कल्पनासाम्यही लक्षात घेण्याजोगे आहे. गोविंदाग्रजांच्याच 'प्रेमाखातर' या कवितेतील प्रश्नालंकारयुक्त शैलीही शेलीच्या रचनाशैलीची आठवण करून देणारी आहे. पहा :

*'गिरितट फोडुनि नद्या कशाला धावतात सांग*
*लता तरुविण सांग कुणाचे फेडितात पांग ?' (पृ. १६८).*

प्रेमानुभवांतील नाट्य, गोड गुंतागुंत या छटांचे चित्रणही काही इंग्रजी कवितांमध्ये आहे. सर पी. सिडने यांची, 'My true love hath my heart, and I have his' ('A Ditty', Book I, page 16) ही ओळ वाचताना भा. रा. तांबे यांची 'हृदय सांग चोरिलें कशास सुंदरी ? देऽ ! दे न देशि जरी दें तुझे तरी !' (पृ. ५३) ही ओळ आठवणे साहजिक ठरते. प्रेमभावनेचे दिव्यत्व सांगणारे वर्डस्वर्थचे एक काव्य असे आहे:

*"She was a phatom of delight*
*When first she gleamed upon my sight"*

आणि त्यात प्रेयसी (पत्नी) चे वर्णन करताना पुढील शब्द आले आहेत :

*'A spirit, yet a woman too*
*Her household motions light and free,*
*And steps of virgin-liberty;'* *यात शेवटी*
*'Something of an angel-light'*

असे स्तुतीपूर्ण उद्‌गार आहेत. तांबे यांच्या 'सहज तुझी हालचाल' (पृ. २१७) या कवितेतील अनेक जागा वरील काव्यदृष्टीशी साम्य दर्शविणाऱ्या आहेत. तांबेही 'अपूर्व शक्ति सगुण' अशा शब्दांत पत्नीचे दिव्यत्व सांगतात आणि त्याच वेळी तिच्या गृहिणीरूपातील साध्या हालचालींचाही कौतुकाने उल्लेख करतात.

प्रेयसीच्या मोहक हालचालींची चित्रदर्शी शैलीतील वर्णने आणि प्रेमपूजनाची वृत्ती हाही इंग्रजी कवितांचा एक विशेष दिसतो. शेलीच्या या ओळी पहा :

*Innocent is the heart's devotion*
*with which I worship thine" (Book IV, page 179 )*

कोलरिजच्या पुढील ओळींतूनही हीच वृत्ती दिसते :

*"her very frowns are fairer far*
*than smiles of other maidens are"*

(Book IV, Page 179) ही प्रेमपूजनाची वृत्ती माधव ज्युलियनांच्या कवितेत प्राधान्याने दिसते. 'स्वप्नरंजन' मध्ये माधव ज्युलियनांनी वरील दोन्ही कवितांचा अनुवाद केला आहे. कोलरिजच्या कवितेचे तर त्यांनी फर्ग्युसन कॉलेज मॅगझिनमध्ये इंग्रजीत विडंबनही केले आहे. ज्युलियनांवर या कवितांचा असलेला प्रभाव त्यामुळे आपोआप सूचित होतो.

तारुण्यसुलभ प्रेमातील बेबंद वृत्ती, निसर्गाची ओढ यांचा नाट्यपूर्ण संवादातून साधलेला आविष्कार काही इंग्रजी काव्यांमध्ये दिसतो. मराठीत भा. रा. तांबे यांची संवादगीते या धर्तीची आहेत. उदा. स्कॉटचे 'The Outlaw' (Book IV) हे कवन आणि तांबे यांचे 'मुशाफिर आम्ही' हे संवादगीत; यांतील रचनाशैलीचे साम्य लक्षणीय आहे.

(२) **निसर्गसंवेदन :** निसर्गातील एखाद्या घटकाशी साधलेला भावसंवाद आणि त्यातून कवीच्या भावविश्वाचे घडणारे दर्शन; हे इंग्रजी कवितेचे वळण अनेक मराठी कवींनी गिरवले आहे. 'गोल्डन ट्रेझरी' मध्ये पक्षी, फुले यांना उद्देशून लिहिलेल्या काही उत्कृष्ट कविता समाविष्ट आहेत. पक्ष्याकडे केवळ एक पक्षी म्हणून न पाहता, अमूर्त सौंदर्याचे प्रतीक म्हणून पाहण्याची त्यातील दृष्टी काव्यात्म आहे. उदा. शेलीचे 'To a Skylark' (Book IV) मधील हे शब्द : 'Bird thou never wert' (Page 243) तसेच वर्डस्वर्थच्या 'To the cuckoo' मधील 'Or but a wondering voice' (Book IV, Page 247) ही

कल्पना यांचा प्रभाव बालकवींच्या कवितेवर (उदा. 'बालविहग') स्पष्टच उमटलेला आहे. कीटस्च्या 'Ode to a Nigthingale' मधील 'Thou wast not born for death, immortal Bird!' (Book IV, Page 250) ही ओळ वाचताना केशवसुतांची 'फुलपाखरूं-मरण पाहिलें आहे का कोणीं ?" (पृ.२७१) ही ओळ चटकन आठवते.

रात्र, तारका, चंद्र यांना उद्देशून असलेल्या कविता 'गोल्डन ट्रेझरी'त अनेक आहेत. आपल्याकडे बालकवींच्या कवितांत या घटकांना स्थान मिळाले आहे. तसेच तांबे यांची 'संध्यातारक' आणि कॅम्पबेलची 'To the Evening star' यांतील साम्यही अभ्यासण्याजोगे आहे.

निसर्गातील घटकांच्या दर्शनाने उचंबळून येणारे कविमन, हे या कवितांमागील मुख्य केंद्र; मग तो निसर्गघटक म्हणजे कधी पक्षी असेल, कधी फूल असेल किंवा एखादा झराही असेल. वर्डस्वर्थच्या 'The Fountain' या कवितेत झऱ्याचे चिरंतन मुक्तपण कविमनाला आकर्षित करीत आहे. या कवितेतील वृत्ती आणि बालकवींच्या 'निर्झरास'मधील भाववृत्ती यांत काही बाबतीत साम्य आढळते. वर्डस्वर्थच्या कवितेतील झराही गाणारा आहे आणि त्याच्या दर्शनाने कवीला मानवी जीवनातील काचणाऱ्या बंधनांची जाणीव होत आहे.

निसर्गात चिरंतन बाल्याचे दर्शन घेणाऱ्या रोमँटिक कवींना निसर्गाशी लहानपणी जडलेले नाते पुढे दुरावले याविषयी हुरहूर वाटत राहते. टी. हूड यांची 'Past and Present' ही कविता पहा:

'To know I' m farther off from heaven than when I was a boy' (Book IV Page 224)

लहानपणी निसर्गाविषयी आपल्या कल्पना अज्ञानजन्य होत्या, तरी त्यात आनंद होता, ही भावना या कवितेत आहे. केशवसुतांच्या 'हरपले श्रेय' मध्ये स्वर्गीय आनंदासाठी जीव पाखडताना अशीच निसर्गाशी नाते तुटल्याची खंत आहे. तसेच त्यांच्याच 'पुष्पाप्रत' मध्ये "तुजमजमध्यें परि केवढी-आहे रुंद दरी रे।" (पृ.२०२) यातही बाल्य व तारुण्य या दोन टप्प्यांमधील जाणिवेचा प्रवास आणि त्यातून निर्माण झालेली खंत व्यक्त झाली आहे.

शेलीच्या 'Ode to the West wind' या कवितेतील कित्येक जागा केशवसुतांच्या 'वातचक्रा'शी ताडून पाहण्याजोग्या आहेत. दोन्ही कवितांतील भावनावेग शब्दरचनेतून मनाला स्पर्श करील इतका प्रभावी आहे. शेलीचे पुढील शब्द आहेत :

> *"Oh, lift me as a wave, a leaf, a cloud!*
> *Drive my dead thoughts over the universe*
> *Like wither'd leaves to quicken a new birth"*

(Book IV, Page 295-297) आणि केशवसुतांच्या 'वातचक्रा'तील हे शब्द आहेत :

*"वाग्देवी गे ! दे शब्दांते*
*भोवऱ्यांत या फेंकुनी, त्यांतें*
*जरा जाऊं दे निजधामाते" (पृ. २६४)*

निसर्गाच्या निमित्ताने मानवी जीवनावर भाष्य करण्याची इंग्रजी काव्यातील प्रवृत्तीही मराठीत आलेली आहे. विजनात मन शांत राहणे, जगरहाटीविषयीची उद्विग्नता, दुःखाविषयी बेपर्वा असणारे भवताल (पहा : 'None takes pity on the pain'– 'The Nightingale' (Book I, Page 22) ही बर्नफिल्डची ओळ आणि 'दुःखाचा वाली कुणा कुणीही न बा रे !'– ('पांखरास,' पृ. १०३) ही बालकवींची ओळ अशा काही भावच्छटा दोन्ही कवितांमध्ये सारख्या आढळतात. निसर्गकवितांतून मानवी जीवनावर औपरोधिक भाष्य करण्याची लकब गोविंदाग्रज, रे. टिळक यांच्या कवितांमध्ये आढळते.

निसर्गातील मुक्ततेचे आकर्षण वाटल्यामुळे खेड्यातील शांत स्वप्नसदृश जीवन जगण्याची ओढ व्यक्त करणारी गीतेही 'गोल्डन ट्रेझरी'त आहेत. शेक्सपिअरची 'under the greenwood tree' ही कविता, रॉजर्सची 'A Wish' ही कविता (पहा : 'Mine be a cot beside the hill' (Book III, Page 143) तसेच ग्रेच्या, 'Elegy written in a country churechyard' मध्ये ग्रामवासियांच्या निरागसतेचे आलेले वर्णन; यांतून खेड्यांतील जीवनाविषयी एक प्रकारचे स्वप्नील आकर्षण निर्माण झालेले दिसते. आपल्याकडे रविकिरणमंडळ कालात निर्माण झालेल्या जानपदगीतांच्या प्रवाहाचे या काव्याशी असलेले नाते पारखणे शक्य आणि आवश्यक आहे. मुक्त निसर्गात रमलेल्या ग्रामकन्यांची शब्दचित्रे वर्डस्वर्थने रेखाटली आहेत. उदा. 'The Reaper', 'The reverie of Poor Susan'. रविकिरण मंडळ काळात अशा प्रकारच्या लेखनाला विशेष बहर आला होता. 'सुगी' (१९३३) हा ग. ल. ठोकळ यांनी संकलित केलेला जानपदगीतांचा संग्रह या दृष्टीने पाहण्याजोगा आहे.

निसर्गाकडे पाहण्याची आधुनिक संवेदनायुक्त दृष्टी इंग्रजी कवितेतून आत्मसात करता करता मराठी कवितेत नकळत काही गोष्टी अंधानुकरणाने शिरलेल्या दिसतात. उदा. इंग्रजी निसर्ग-काव्यात 'Spring' (वसंत ऋतू)ला फार मोठे स्थान आहे. 'गोल्डन ट्रेझरी'मध्येही 'स्प्रिंग' चे कौतुक करणारी गीते, कविता अनेक आहेत. आधुनिक मराठी वाङ्मयात नियतकालिकांच्या वासंतिक पुरवण्या काढून वसंत ऋतुपर कविता, लेखन प्रसिद्ध करण्याचे अक्षरशः पेव फुटलेले दिसते. यामागे इंग्रजांच्या वाङ्मयीन दृष्टीचे अनुकरण करण्याची प्रवृत्ती असावी. वास्तविक पाहता उष्ण कटिबंधात मोडणाऱ्या आपल्या देशात– विशेषतः महाराष्ट्रात– वसंत ऋतू हा आल्हाददायक वाटावा, अशी भौगोलिक परिस्थिती नाही. याउलट कडाक्याच्या थंडीनंतर आलेला 'स्प्रिंग' इंग्रजांना हवाहवासा वाटणे साहजिक आहे. त्यामुळे त्यांच्या साहित्यविश्वात 'स्प्रिंग' विषयीचा उत्साह ओसंडून



अनुक्रमणिका

व्यक्त होत असतो.

मराठीतील वसंतऋतुपर लेखनाची सुरू झालेली टूम हास्यास्पद असल्याचे गोविंदाग्रज ऊर्फ राम गणेश गडकरी यांनी फार मार्मिकपणे लक्षात आणून दिले आहे. त्यांच्या 'हुकमेहुकूम' या विनोदी कवितेतील 'वसंत का कधि ऋतु दुसरा कधि कुणीं पाहिला कवनीं !' (पृ. १४४) हा प्रश्न तत्कालीन कवींच्या वसंतऋतूविषयक अवाजवी उत्साही सुरातील लेखनाची एकप्रकारे खिल्ली उडवतो. तसेच त्यांच्या वसंत ऋतूचे वर्णन करणाऱ्या एका विनोदी लेखातही[३] 'प्रत्यक्षावलोकना'वर भिस्त ठेवल्यानंतर वसंत ऋतूचे सामोरे येणारे वास्तव रूप किती अकाव्यात्म आहे; हे उपहासगर्भ शैलीतून सूचित केले आहे. पक्षी-गणाचे प्रतिनिधित्व करणारा वळचणीतला पारवा, पुष्पसृष्टीची साक्ष पटवायला भावड्याच्या टोपीवरील वेलबुट्टीचा घ्यावा लागणारा आधार; अशा निरीक्षणांतून (अतिशयोक्ती वजा जाताही) भवतालच्या वास्तवाशी नाते सुटलेले तत्कालीन निसर्गवर्णन त्यांनी टीकाविषय केले आहे. (मात्र मराठी कवींनी यातील गर्भित टीका फारशी गंभीरपणे घेतलेली दिसत नाही; असे पुढील कालखंडातील कविता वाचताना जाणवते.)

(३) **कवित्वशक्तीचे भान :** स्वतःच्या प्रतिभाशक्तीचे-अलौकिक सामर्थ्याचे भान हाही रोमँटिक कविप्रकृतीचा एक ठळक विशेष होय. कवित्वशक्तीविषयी दिव्यत्वाचे वलय या वृत्तीतून निर्माण झाले होते. आपल्याकडील आधुनिक कवींच्या पहिल्या पिढीत हे आत्मभान प्रखरपणे जाणवते. 'गोल्डन ट्रेझरी'त समाविष्ट असलेल्या जे. कीटस्‌च्या 'Ode on the poet' या कवितेतील पुढील ओळी पहा :

*"Yes, and those of heaven commune*
*With the spheres of sun and moon*

आणि

*"Thus ye live on high, and then*
*On the earth ye live again" (Book IV, Page 170)*

या ओळींमधून व्यक्त झालेली भावना आणि केशवसुतांच्या 'आम्ही कोण ?' या कवितेतील आशय यात साम्य आहे. तसेच बालकवींच्या 'मी' व 'कविबाळे' या कवितांशीही तिचे साम्य आहे. कीटस्‌च्या कवितेतील कवीला स्वर्गीयतेचे आकर्षण असले तरी त्याचे पार्थिवतेशी असलेले नाते तुटलेले नाही. केशवसुतांच्या काव्यविषयक भूमिकेशी या वृत्तीचा सांधा जुळतो. शेलीच्या 'The poet's Dream' मध्येही कवीच्या कार्यावर भाष्य येते. ते असे :

*'But from these create he can*
*Forms more real than living Man,*
*Nurslings of Immortaility!" (Book IV, Page 299)*

कवित्वशक्तीच्या दिव्य सामर्थ्याची जाणीव जशी या कवींना आहे, तशीच कवित्वाचे रहस्य

शोधण्याची त्यांना जिज्ञासाही आहे. कविमन भावव्याकुळ असते; तितकेच कल्पनांमध्ये रमणारेही असते. कल्पनांची निर्मिती करण्यामागे बुद्धीचाही वाटा असतो. त्यामुळे शेक्सपिअरने एके ठिकाणी विचारलेला प्रश्न आहे असा :

'Tell me where is Fancy bred

Or in the heart, or in the head?' ('Madrigal,' I, page 30)

हा प्रश्न वाचताना गोविंदाग्रजांच्या 'हुरहूर' (पृ.५३) या कवितेतील असाच एक प्रश्न आठवतो.

'बुद्धीला जिरवीन भावजलीं का, आशा न माते दुजी ?' कविव्यक्तिमत्त्वातील बुद्धी व भावना या दोन घटकांचे योग्य संश्लेषण झाले नाही तर कवितेचा तोल ढासळतो. या संदर्भात स्वतःचा असा अंतर्शोध घ्यावासा वाटणारे हे दोघेही कवी, नाटककारही होते; हा केवळ योगायोग नसावा.

**(४) बाल्याचे आकर्षण :** निरागस बाल्य हे चिरंतनाचे प्रतीक मानून त्याविषयीचे आकर्षण व्यक्त करणाऱ्या रोमँटिक कविवृत्तीच्या कविता 'गोल्डन ट्रेझरी'त आहेत. वर्डस्वर्थची 'Ode on the Intimations of Immortality'ही कविता सुरुवातीलाच हीच जाणीव व्यक्त करते. 'Heaven lies about us in our infancy' (Book IV, Page 310) ही ओळ आणि केशवसुतांच्या 'हरपले श्रेय'च्या पहिल्या कडव्यातील लहानपणीच्या भातुकलीच्या खेळातील हरपलेल्या निरागस सुखाचा आलेला निर्देश, यात वृत्तीचे साम्य आहे.

एच. वॉघन यांच्या 'The Retreat' या कवितेतही बाल्याचे उदात्तीकरण आलेले आहे :

*"Happy those early days, when I*
*Shined in my Angel– infancy!" (Book II, Page 65)*

बाल्याचे हे 'स्वर्गीय' रूपातील दर्शन मराठी कवींना प्रभावित करून गेले आहे. केशवसुतांच्या 'प्रौढत्वी निज शैशवास जपणे बाणा कवीचा असे' या भूमिकेमागे याच वृत्तीचा ठसा आहे. बालकवींच्या तर संपूर्ण कविव्यक्तिमत्त्वातच बाल्य भिनलेले आहे.

बालकवी, रे. टिळक या कवींनी बालांसाठी काही चांगल्या कविता लिहिल्या यामागेही या दृष्टिकोनाची प्रेरणा असावी.

**(५) नादसंमोहन :** नादसंवेदनेत रंगून जाणे, हा रोमँटिक सौंदर्यवृत्तीचा एक विशेष दिसतो. अलौकिकाचा ध्यास असणाऱ्या रोमँटिक वृत्तीला अलौकिक आनंदाची प्राप्ती करून देणाऱ्या संगीताचे आकर्षण वाटणे साहजिक ठरते. जे. मिल्टनची 'At a solemn Music' डब्ल्यू. कॉलिन्सची 'The Passions' (An ode for music) तसेच जे. ड्रायडनची 'Alexander's Feast of The Power of Music' या 'गोल्डन ट्रेझरी'तील

काही कवितांतून याची जाणीव होते. सुरांशी संबंधित प्रतिमांची योजनाही अनेक कवींनी केलेली आढळते.

कॉलिन्सच्या वर उल्लेखिलेल्या कवितेत भीती, राग, निराशा, आशा, आनंद अशा वेगवेगळ्या भावनांचे चढत्या क्रमाने दर्शन घडते. केशवसुतांच्या 'सतारीचे बोल' या कवितेचा घाटही याच प्रकारचा आहे.

केशवसुत, बालकवी, गोविंदाग्रज यांना नादाचे आकर्षण असल्याचे त्यांच्या कवितांतून जाणवते. या कवींनी आपल्या कवितांच्या शीर्षकातही अनेक ठिकाणी 'गाणे' हा शब्द योजिला आहे. उदा. केशवसुत 'थकलेल्या भटकणाराचे गाणे,' बालकवी– 'माझे गाणे'. बालकवींच्या कवितेत तर 'गाणे' हा शब्द एक प्रतिमा बनूनच येतो. उदा. 'या विश्वाची एकतानता, हे माझे गाणे' ('माझे गाणे' पृ. १३६) एकेका सुरामुळे एकेक फूल उमलते, ही त्यांच्याच 'कविबाळे'तील कल्पनाही नादाचे चैतन्याशी त्यांना अभिप्रेत असलेले नाते स्पष्ट करते. केशवसुतांची 'झपूर्झा' ही नादप्रतिमा देखील अनोखी व तरल आहे.

मुळात इंग्रजी लिरिक्समध्ये कवितेला लायर या वाद्याची साथ अभिप्रेत असे. इंग्रजी कविता व गीते यांच्या प्रभावातून मराठीत भावकविता हा प्रकार आला. या प्रकाराचे संगीताशी नाते किती ? त्यासाठी कोणती संज्ञा योग्य– गीतक, भावगीत ही भावकविता ? इत्यादी प्रश्न आपल्याकडे पुढे चर्चिले गेले आणि भावकविता ही संज्ञाच सर्वसाधारण रूढ झाली. तरीही इंग्रजी कवितेतील नादसंमोहन मराठी कवींनाही भूल पाडून गेलेले आहे; त्यांच्या तरल सौंदर्य जाणिवांना हलकेच जाग आणून गेलेले आहे. हे लक्षात ठेवावे लागते.

(६) **जीवनविषयक चिंतन :** जीवनाला उद्देशून कविता करणे, जगरहाटी, कालगती याविषयीचे भावचिंतन व्यक्त करणे; ही रीत इंग्रजी कवितांमध्ये आढळते. त्यात मृत्यूची नश्वरतेची जाणीव काहीशा कातरपणे येते. कीटस्‌ची 'The Terror of Death,' शेक्सपिअरची 'The Triumph of Death' ड्रमंडची 'This life, which seems so fair is like a bubble blown up in the air' (Book I, Page 37) ही कविता उदाहरणार्थ आठवतात. आपल्याकडे ड्रमंडच्या कवितेचे केशवसुतांनी भाषांतर केले आहे. गोविंदाग्रजांच्या 'आणि जीविता, लाभ हाच का तुझ्या संगती राहुनिया ? असेच जाणे असे सदा का कालौघावर वाहुनिया ?' ('जीवितास' पृ. १४२) या ओळीही जीवनचिंतनात कारुण्यभाव आणणाऱ्या आहेत.

जीवनचिंतनात सूक्ष्म असे कालसंवेदनही अंतर्भूत असते. सरणाऱ्या काळाची चाहूल लागून प्रत्येक निसटणाऱ्या क्षणाने होणारी घुसमट बालकवींनी अतीव भावस्पर्शीपणे व्यक्त केली आहे. पहा, 'संध्येच्या सुंदर छाया निमिषांतच काजळताती' ('अतृप्ति' पृ. २०४) ही कालसंवेदनेची वृत्ती इंग्रजी कवितेच्या संस्कारातून आली असावी. पी. बी. शेलीची 'A Lament' ही कविता पहा.











*'O World! O Life! O Time!*
*On whose Last steps I climb,*
*Trembling at that where I had stood before,*
*When will return the glory of your prime?*
*No more– Oh, never more!' (Book IV, page 307)*

निवृत्तिवादी भारतीय तत्त्वज्ञानामुळे संतकाव्यात कालगतीचे दर्शन घडते. पण आधुनिक कवींच्या कवितेतील कालसंवेदनेचे रूप तत्त्वज्ञानातील दृष्टिकोनापेक्षा भावव्याकुळ शोध या प्रकारचे वाटते. त्यामुळे इंग्रजी कवितेशी या रूपाचे नाते शोधावेसे वाटते.

'गोल्डन ट्रेझरी' वाचताना तिच्या प्रकाशात आधुनिक मराठी काव्य न्याहाळावेसे वाटले. वास्तविक, हा एका प्रबंधाचा विषय आहे. इंग्रजी कवितेच्या शैलीचाही मराठी कवितेवरील परिणाम खोलात जाऊन पाहणे शक्य आहे. उदा. त्यातील उद्देशिकांमध्ये येणारी उद्‌गारवाचकांची रेलचेल, (O, Oh अशी), अलंकारिक संबोधने (Life of Life, Child of Light इ.) प्रश्नालंकारांचा वापर, द्विरुक्ती, संवादांची योजना, अद्‌भुततेची डूब, कथात्मकतेचा अंतर्भाव अशा अनेक अंगांचा मराठी कवितेवर कळत नकळत ठसा उमटला आहे. माझा प्रयत्न हा विषयाकडे लक्ष वेधण्याइतका मर्यादित आहे.

### संदर्भसूची


१. 'समग्र माधव ज्युलियन' खंड पहिला, व्हीनस प्रकाशन, पुणे १९७७, पृ. ४३२
२. 'विरहतरंग' माधव ज्युलियन, संपा. रा. श्री. जोग, व्हीनस प्रकाशन, पुणे आ. ५, १९६०, पृ. ५६
३. 'रिकामपणची कामगिरी', धडा सहावा, 'संपूर्ण बाळकराम', रम्यकथा प्रकाशन, पुणे १९७०.


### संदर्भग्रंथ


(लेखात उद्‌धृत केलेली अवतरणे पुढील ग्रंथांतील आहेत.)
१. 'The Golden Treasury', selected by Franeis Turner Palgrave, Oxford University Press. 1964
२. 'समग्र केशवसुत', संपा. भ. श्री. पंडित, व्हीनस प्रकाशन, आ. २, पुणे १९७०
३. 'वाग्वैजयंति', गोविंदाग्रज, प्रका. अ. स. गोखले, पुणे आ. ३, १९२९.
४. 'समग्र बालकवी' संपा. पार्वतीबाई ठोमरे, व्हीनस प्रकाशन, पुणे १९६६
५. 'भास्कर रामचंद्र तांबे यांची समग्र कविता' व्हीनस प्रकाशन, पुणे आ. ४ १९५३.



(३, अन्नपूर्णा, सुभाषनगर, शुक्रवार पेठ, ४११००२)












अनतराव कुलकणा

# मराठी भाषा खऱ्या अर्थाने जगवायची असेल तर-

ग्रंथप्रसाराचे कार्य करणाऱ्या एखाद्या व्यक्तीचा साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावर सत्कार व्हावा असे ठरले आणि त्यासाठी माझी निवड झाली. साहित्य प्रसार करणारे जे जे प्रमुख घटक आहेत त्या सर्व मुद्रक, प्रकाशक, पुस्तक विक्रेते व संपादक या सर्वांचा एक प्रतिनिधी म्हणून मी हा सत्कार स्वीकारलेला आहे असे आपण समजा.

नियतीच्या एका खेळीची या प्रसंगी आठवण होत आहे. १९३८ साली मी माझ्या



प्रकाशन व्यवसायाला सुरुवात केली. १९४० पर्यंत आमची म्हणजे कॉन्टिनेंटल प्रकाशनाची फार तर सात-आठ पुस्तके प्रसिद्ध झालेली असावीत. ती विकण्यासाठी मी प्रथम गोव्यात आलो होतो. कॉन्टिनेंटल प्रकाशनचे चित्रकार आणि माझे परम मित्र श्री. दीनानाथ दलाल यांचे ओळखपत्र घेऊन मी आलेलो होतो. दलालांनी मला येथील काही सधन लोकांचे पत्ते दिलेले होते. सारीच नावे आता काही नीट आठवत नाहीत, पण नाईक, बांदोडकर, काकोडकर, चौगुले, ढेंपे, गोगटे अशीच काही तरी ती होती. त्या त्या घरी मी जात होतो, पिशवीतून पुस्तके काढून त्यांना दाखवीत होतो आणि काही विकत घ्या अशी विनंती करीत होतो. माझी ही भटकंती बरीचशी पायीपायीच होती. त्या पाच-सात दिवसांतले माझे कष्ट नियती पाहत असावी. आज पन्नास वर्षांनी त्याच गोव्याच्या या भूमीवर आणि साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावर माझा यथोचित सत्कार होतो आहे, हा त्या नियतीचाच खेळ आहे. मला त्या नियतीचे आभार मानलेच पाहिजेत. मी ते तुमच्या समक्ष मानीत आहे.

तुमच्या परवानगीने मी थोडे विषयांतर करीत आहे. कालपरवाच या व्यासपीठावरून नवकथा आणि तिचे शिल्पकार सर्वश्री गोखले, गाडगीळ, भावे, माडगूळकर यांच्याबद्दल आपण काही चांगले ऐकलेले आहे. या चारही कथाकारांचे बरेच कथासंग्रह कॉन्टिनेंटल प्रकाशनने प्रसिद्ध केलेले आहेत. नुसते सुटे कथासंग्रहच नव्हेत, तर त्या त्या कथाकाराचे निवडक कथांचे संग्रह प्रसिद्ध करणाराही मी प्रकाशक आहे. या सर्व कथाकारांचे संग्रह प्रसिद्ध करणारा मीच एकमेव प्रकाशक आहे असे मला वाटते. तरीही चूकभूल द्यावी घ्यावी.

बोलता बोलता काही व्यक्तींच्या आठवणी गळयात दाटून आलेल्या आहेत. त्या बोलून टाकल्याशिवाय आवाज मोकळा होणार नाही. मला आठवण होते आहे ती कवी बोरकरांची, लक्ष्मणराव सरदेसाई यांची, महादेवशास्त्री जोशी यांची. या कॉन्टिनेंटल प्रकाशनांच्या दिवंगत लेखकांची मला आज आठवणे होणे साहजिकच आहे. विशेष आठवण होते आहे ती माझ्यावर धाकट्या भावाप्रमाणे प्रेम करणाऱ्या सुधाताई जोशी यांची. स्वर कापरा झाला आहे, त्याला इलाज नाही. मला आपण हवे तर भाबडा, हळवा समजा आणि क्षमा करा. पण काय सांगतोय ते ऐकून घ्या.

या गोव्यात मीर मारच्या किनारी एका पौर्णिमेच्या चांदण्या रात्री वाळवंटावर बसून मी काही कविता ऐकलेल्या आहेत. ऐकल्या आहेत त्या बोरकर, कुसुमाग्रजांच्या. दोन्ही कविराज, एक राजर्षी तर दुसरा ब्रह्मर्षी, धुंद होऊन कविता म्हणत होते. बोरकर कुसुमाग्रजांच्या कविता म्हणत कुसुमाग्रज बोरकरांच्या म्हणत. मी त्यांचा दोघांचाही प्रकाशक जणू देवर्षी बनून ती मैफल रसिकतेने ऐकत होतो. देवर्षी मी माझे मला म्हणून घेतोय असे नाही. बोरकरांनी त्या रात्री मला ती पदवी बहाल केलेली होती. तास-दीड तास चाललेली ती जुगलबंदी मला अजून चांगली आठवत आहे.

मी व्यवसायाला सुरुवात केली त्या काळी बृहन्महाराष्ट्रात– ग्वाल्हेर, इंदोर ते










गोवा-कारवार आणि कोकण-मुंबई ते नागपूर, चंद्रपूर महाराष्ट्राच्या उत्तर-दक्षिण आणि पश्चिम-पूर्व या चारही दिशांच्या सीमेत फार तर चाळीस-पन्नास व्यावसायिक प्रकाशनाचा प्रपंच करीत होते. आज ही संख्या ४०० ते ५०० पर्यंत सहजच गेलेली आहे. त्या दिवसात दरवर्षी फार तर दोन-तीनशे पुस्तके प्रसिद्ध होत होती. पुस्तके म्हणजे ललित पुस्तकेच. इतर ग्रंथांबद्दल मी हे बोलत नाही. आज सुमारे दोन-अडीच हजार तरी पुस्तके प्रतिवर्षी प्रसिद्ध होऊन विक्रीस येत आहेत. पण पुस्तकांच्या खपाचे प्रमाण दर पुस्तकी पूर्वी जसे होते तसे व तितकेच राहिलेले आहे. त्यात वाढ झालेली नाही. पुस्तक प्रसिद्ध झाले की पहिल्या वर्षात पूर्वी २५०-३०० प्रती खपत. तितक्याच आजही ४०-५० वर्षांनंतर खपत आहेत. त्या संख्येत काही वाढ झालेली नाही. याची फार मोठी खंत मला वाटत आहे. कारणे काहीही असोत. आकाशवाणी, दूरदर्शन, मासिके, नियतकालिके शिवाय दैनिक वृत्तपत्रांच्या साप्ताहिक पुरवण्या या करमणुकीच्या इतर सोयी-साधनांमुळे असो; पुस्तकांचा खप पूर्वी होता तितकाच राहिलेला आहे, ही वस्तुस्थिती आहे. पुस्तके प्रकाशकांच्या अपेक्षेप्रमाणे वाचली जात नाहीत आणि खरेदीही केली जात नाहीत.

साहित्य खपले तरच भाषा जगेल आणि भाषा जगली तरच संस्कृती टिकेल. त्यासाठी आपण सर्वांनी काही तरी करावयास हवे आहे. ग्रंथप्रसार झाला पाहिजे व त्यासाठी साहित्यकृती घरोघर पोहोचल्या पाहिजेत. त्यासाठी आपणास काय करता येईल ते आपण पाहू या. अति श्रीमंत आणि अगदी गरीब कुटुंबीयांना आपण तूर्त वगळू या. मध्यमवर्गियांच्याबद्दलच बोलूया. त्यांच्या घरी आपण डोकावले तर काय दिसते, पहा. सोफासेट असतो, फ्रीज दिसतो, धुण्याचे मशीन असते, क्रॉकरी आणि खेळणी, इतर शोभेच्या वस्तूंची भरलेली कपाटे दिसतात. पण एखाद्या कोपऱ्यात एक लहानसे का होईना, पुस्तकाचे कपाट काही दिसत नाही. अशा सुखवस्तू लोकांच्या घरात दरमहा दोन-तीनशे रुपये खर्च होऊन काही पुस्तके आली तर मला हवी आहेत. पुस्तकांमुळे करमणूक तर होईलच, पण ग्रंथवाचनाने काही प्रबोधन होईल. वाचणाराचे जीवन इतरांचे अनुभव वाचून अधिक समृद्धही होईल. आपली वाचून झाली की, पुढच्या पिढीलाही ती ग्रंथसंपत्ती उपयोगी पडेल अशी ग्रंथखरेदी झाली तर काय हरकत आहे? पण तसे होत नाही. ग्रंथप्रसाराला हातभार लागत नाही, तो तुम्ही मंडळींनी लावावा अशी माझी विनंती आहे. संमेलनाच्या प्रांगणात अनेक ग्रंथविक्रेते आपापले स्टॉल्स लावून ग्राहकांची वाट पाहत आहेत. ग्रंथप्रसार करणाऱ्यांचा मी एक घटक व प्रतिनिधी म्हणूनच तुमच्यापुढे उभा आहे. आज मी मुद्दामच सर्व ग्रंथविक्रेत्यांकडे चक्कर टाकून आलेलो आहे. विक्री बरी होत आहे असे समाधान कोणीही व्यक्त केलेले नाही. म्हणून मी हे बोलून गेलेलो आहे.

पुस्तकांच्या किंमती भरमसाट असतात अशी एक ओरड सर्वत्र ऐकू येते पण ती काही खरी नाही. ही सबब पोकळ आहे. एके काळी रुपयाला चांगला सहा शेर तांदूळ मिळत

होता. आता तो दहा रुपये किलो झालेला आहे. पूर्वी एका रुपयाला चार शेर मिळणारे कोरे दूध आता बारा रुपये झालेले आहे. ही महागाई ४०-५० पट आहे. अन्नधान्यच काय भाज्यासुद्धा अनेक पट महाग झालेल्या आहेत. आपण ही महागाई सोसतो. आणि त्या त्या वस्तू विकत घेतो. घ्याव्या लागतातच. त्या मानाने पुस्तके फार तर दहा-बारा पटच महाग झालेली आहेत. ती किमतीने आपणास भरमसाट वाढलेली भासतात. भासतात म्हणजे महाग नसताना आहेत अशी वाटतात. विचार करा, मी काय म्हणतोय ते आपल्याला पटेल की पुस्तके मात्र तितकी महाग नाहीत. सार्वजनिक वाचनालये वाढलेली आहेत. ग्रंथखरेदीसाठी सरकारी अनुदान असणाऱ्या शाळा-कॉलेजेससारख्या शिक्षणसंस्था वाढलेल्या आहेत, पण पुस्तकांचा प्रत्येकी खप मात्र त्या प्रमाणात वाढलेला नाही. तो वाढावयाला हवा आहे. काही घरातून चार-दोन पुस्तके दिसतात; अगदीच नाहीत असे नाही. पण ती कोणती असतात ? तर घराची प्रतिष्ठा दिसावी म्हणून ज्ञानेश्वरी, गाथा यासारखा एखाददुसरा ग्रंथ किंवा पाकक्रियेवरील एखादे पुस्तक. चुकून एखाददुसरी ऐतिहासिक वा पौराणिक कादंबरी. पण इतर ललित साहित्याची पुस्तके म्हणावी तितकी मात्र दिसत नाहीत.

मित्रहो, मराठी भाषा जर खऱ्या अर्थाने जगवायची असेल तर पुस्तके खरेदी केली गेली पाहिजेतच असे मला वाटते. ते वाटणे तुम्हाला अवास्तव वाटू नये, अशी माझी तुमच्याकडून अपेक्षा आहे.

---

पणजी येथे झालेल्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनात ज्येष्ठ प्रकाशक श्री. अनंतराव कुलकर्णी यांचा सत्कार करण्यात आला. त्याप्रसंगी त्यांनी उत्तरादाखल केलेल्या भाषणाची ही संपादित आवृत्ती.

---

(कॉन्टिनेंटल प्रकाशन, विजयानगर कॉलनी, पुणे ४११०३०.)





अनुक्रमणिका



# केशवसुतांच्या गावी

निसर्गातल्या द्युतिसंपन्न वस्तूंशी आत्मीयतेचं नातं जोडणाऱ्या आणि–

*जेथे ओढे वनराजी । वृत्ति रमे तेथे माझी*
*कारण काही साक्ष तिथे । मम त्या श्रेयाची पटते*

असा 'हरपले श्रेय' या कवितेतून आपला निसर्गविषयक दृष्टिकोन स्पष्ट करणाऱ्या, आधुनिक कवितेच्या जनकाच्या– केशवसुतांच्या माल्यकूट - मालगुंड गावी जायचं, जिथे त्यांचा जन्म झाला ते घर पाहायचं ही मनीची आस पूर्ण होणार अशी चिन्हं दिसू लागली. केशवसुत– कृष्णाजी केशव दामले. दोन वर्षांपूर्वी त्यांच्या १२५व्या जयंतीनिमित्तानं त्यांच्या जन्मग्रामी स्मारक होणार आहे अशी घोषणा झाली आणि कार्यवाहीही सुरू झाली. त्या मे महिन्यात मला व्याख्यानाच्या निमित्ताने रत्नागिरीचं निमंत्रण आलं. निमंत्रणाबरोबर मला आठवण झाली ती रत्नागिरीजवळ ३० मैलांवर असलेल्या गणपतीपुळ्याजवळील मालगुंड या केशवसुतांच्या जन्मस्थळाची. असा योग जुळून आला होता– कवींच्या गावी जायचं, तो परिसर पाहायचा आणि त्या कवीच्या जन्मस्थळाचं, त्या परिसराचं चित्रण करायचं. त्यासाठी अशी काही कवींची गावं मी निवडली होती आणि नेमकं त्याच सुमारास हे निमंत्रण मला आलं होतं. मला जी लेखमाला लिहायची होती, त्याचा हा शुभशकून होता आणि आधुनिक काव्याचे जनक ज्यांना आपण मानतो त्यांच्या जन्मगावी जाण्याची संधीही चालून आली होती. दहा वर्षांपूर्वी मी अशीच कामानिमित्त रत्नागिरीला गेले होते. तेथून पुळ्याला गणपतिदर्शनासाठी. त्या वेळी या महाकवीचं गाव दुरूनच पाहिलं होतं. आता मात्र हे गाव ताबडतोब पाहायचं होतं. त्याला कारणही तसंच होतं. या कवीचं तिथे स्मारक व्हायच्या आधी हा प्रतिभावंत कवी जिथे जन्मला, ज्याच्या दुडुदुडु चालीने, ज्याच्या वास्तव्याने आणि ज्याच्या स्पर्शाने जी कुटी चेतनामयी झाली ती जशी होती त्या स्वरूपात पाहायची. स्मारक झाल्यावर तिथे खूपच वदल होतील.

*ज्यांच्या रम्य तटावरी पसरल्या झाड्या किती सुंदर*
*ज्यांच्या थोर शिलातुनी धबधबा जाती तसे निर्झर*
*वाणीचे कवीदुर्दशांमधुनिया ते ओघ यावे जसे*
*या दृष्टीपुढते पुनः बघतसे अप्रिय ते हो असे !*

अशा या आपल्या जन्मस्थळाबद्दल विलक्षण प्रेम असणाऱ्या केशवसुतांच्या जन्मगावी



अनुक्रमणिका






स्मारक झाल्यावर तिथे बरेच बदल होतीलही. शंभर-सव्वाशे वर्षांत तर निश्चित झालेले असणारच. एखाद्या स्थळाला विशेष महत्त्व प्राप्त झालं की त्याचं मूळ सौंदर्य कमी होतं आणि त्याला एक बाजारू रूप येऊन त्याचं मांगल्य नष्ट होतं असं, कोण जाणे, मला नेहमी जाणवतं. कदाचित तो माझ्या मनाने केलेला तर्क असेल, पण असा तर्क बरेचदा खराही घडला आहे.

रत्नागिरीला व्याख्यानाला जायचं ठरलं. तिथे मत्स्य-महाविद्यालयातील प्राध्यापक डॉ. अनिल रानडे यांच्याकडे उतरण्याची सोय झाली होती. व्याख्यान झाल्यावर दुसऱ्या दिवशी मला मालगुंडला जायचं आहे, तेव्हा रिझर्वेशन करून ठेवा असं मी त्यांना कळवलं होतं. कारण मे महिना सुटीचा. ऐनवेळी गाडीला गर्दी वगैरे असणार. त्यामुळे रिझर्वेशन असलेलं बरं. त्या मंडळींनी त्याप्रमाणे काम केलं होतंच पण त्यांच्या मातोश्री विजयाताईही माझ्याबरोबर येणार होत्या. मला आनंद झाला. वाटेत गप्पा मारायला कुणीतरी मिळालं, शिवाय त्यांना तो परिसर माहितीही होता. रत्नागिरीहून सकाळी मालगुंड-तिवेंडी-पुळे अशा मार्गावरून जाणारी गाडी मिळाली. अंतर सव्वा-दीड तासाचं. सकाळीसुद्धा उन्हाने काहिली होत होती. मे महिन्याचं ऊन्न चांगलंच जाणवत होतं. स्थानकावर तर भट्टी पेटल्यासारखं वाटत होतं. एस. टी. सुरू झाली आणि चुकार झुळुक आत शिरली तेव्हा कुठे बरं वाटलं. एस. टी. स्टँडवर वाटत होतं, नको हा प्रवास. वातावरणातला उष्मा सहन होत नव्हता. पण आपल्याला लागलेली एखाद्या गोष्टीची ओढ पूर्ण करताना आजूबाजूच्या वातावरणाला पूर्ण विसरायला होतं तसं झालं. डोळ्यापुढे 'माल्यकूट' होतं कवितेतलं.

*'जन्मस्थान मदीय सुंदर असे त्या माल्यकूटातल्या*
*आनंदे वनदेवता मधुर जी गाने भली गाइल्या*
*मज्जन्मावसरास ती पवन हा वेगे महा तेथुनी*
*माते पोचवितो तया अपुलिया पंखावरी वाहुनी'*

'नैऋत्येकडील वारा'मधल्या ओळी ओठावर येऊ लागल्या. कॉलेजात असताना केशवसुतांच्या अभ्यासलेल्या कविता तोंडपाठ होत्या. नव्हे, नवा शिपाई, सतारीचे बोल, झपूर्झा, तुतारी या कवितांनी भारून आणि भारावून टाकलं होतं. ओळन् ओळ तोंडपाठ केली होती.

*प्राप्तकाल हा विशाल भूधर*
*सुंदर लेणी तयात खोदा*

*शान्तीचे साम्राज्य स्थापू बघत काळ तो आहे*
*प्रेषित त्याचा नव्या दमाचा शूर शिपाई आहे.*

*हर्षखेद ते मावळले*
*हास्य निमाले*

*अश्रू पळाले*
*कण्टकशल्ये बोथटली*
*मखमालीची लव वठली*
*काही न दिसे दृष्टीला*
*प्रकाश गेला*
*तिमिर हरपला;*
*काय म्हणावे या स्थितीला ?*
*झपूर्झा ! गडे झपूर्झा*

किती भरभरून कविता आठवायला लागल्या. या 'झपूर्झा'नं तर वेड लावलं होतं. कॉलेजातले पंचवीस वर्षांपूर्वीचे दिवस. मन आता त्या भूतकाळातल्या कॉलेजच्या दिवसांत जाऊन पोहोचलं. केशवसुतांचं जन्मशताब्दी वर्ष होतं ते. गं. बा. सरदार सर आम्हाला त्या वेळी मराठी शिकवायचे. जन्मशताब्दी वर्षानिमित्ताने मुंबईला काव्यस्पर्धा जाहीर केली होती. त्या स्पर्धेत भाग घ्यायला म्हणून आम्हा दोन मुलींना कॉलेजातून निवडून मुंबईला स्पर्धेसाठी नेलं होतं. विद्यापीठाच्या सर्व कॉलेजांतील प्रतिनिधी तिथे हजर होत्या. स्पर्धेसाठी मुंबईला जायची माझी पहिली वेळ होती. कविता वाचून दाखवून निकाल लागेपर्यंत वाटलंही नव्हतं, मला त्या स्पर्धेत प्रथम क्रमांकाचं बक्षीस विभागून मिळेल. तेव्हापासून केशवसुतांच्या काव्याची विलक्षण ओढ मी अत्यंत आदराने मनात जपलेली आहे.

*'पद्यपंक्तीची तरफ आमुच्या करी विधीने दिली असे*
*टेकुनि ती जनताशीर्षावर जग उलथुनिया देऊ कसे*
*बंडाचा तो झेंडा उभवुनि धामधूम जिकडे तिकडे*
*उडवुनि देऊ करू पाशवी शल्यांचे तुकडे तुकडे'*

असे सामाजिक क्रांतीसंबंधीचे विचार अत्यंत निर्भिडपणे आपल्या काव्यपंक्तीतून व्यक्त करणारे, 'देवदानवा नरे निर्मिले हे मत लोका कवळू द्या' असे प्रखर उद्‌गार आपल्या कवितेतून काढणारे, 'अंत्यजाच्या मुलाचा पहिला प्रश्न' कवितेत मांडणारे, सामाजिक जीवनात सलणारी शल्ये जळजळीत शब्दात व्यक्त करणारे, रूढीविरुद्ध बंड पुकारणारे, स्वप्राणाने तुतारी फुंकताना 'हल्ला करण्या तर दंभावर तर बंडावर शूरांनो या त्वरा करा रे। समतेचा ध्वज उंच धरा रे।' असा संदेश देणारे आणि-

*आम्ही कोण म्हणून काय पुसता आम्ही असू लाडके*
*देवाचे दिधले असे जग तये आम्हास खेळावया*
*आम्हाला वगळा गतप्रभ झणी होतील तारागणे*
*आम्हाला वगळा विकेल कवडी मोलापरी हे जिणे*

असा दांडगा आत्मविश्वास आपल्या काव्यातून प्रगट करणारे, 'साध्याही विषयात आशय कधी मोठा किती आढळे' असं सांगताना नुसता मोठा आशय नाही, तर स्वर्ग पाहणाऱ्या या

महाकवीच्या, आधुनिक मराठी काव्याच्या आद्य प्रवर्तकाच्या काव्यातील नानाविध पंक्ती आणि काव्याची रूपं मनात उजळत होती.

गाडीला हीऽ गर्दी होती. पण रिझर्वेशनमुळे बसायला जागा होती. मेंढरं कोंबल्यागत माणसं आत कोंबली होती. आधीच उकडून जीव हैराण झालेला. पुळ्यापर्यंत प्रवास तरी दीड तासाचा होता. कोकणातले रस्ते वळणावळणाचे. कच्चे, खाच-खळग्यांचे. वळण आलं की गाडी कलंडते आहे की काय असं वाटत होतं. दारात तर माणसं लटकलेली. पण ड्रायव्हर शिताफीनं गाडी चालवत होता. रोजचंच अंगवळणी पडलेलं. हा गर्दीचा महापूर इकडून तिकडे न्यायचा. आता मी परत केशवसुतांच्या मालुगंडात मनानं शिरत होते. कोकणच्या कुशीत विसावलेल्या मालगुंड गावी या आधुनिक काव्याच्या जनकाचं स्मारक होणार आहे आणि हे त्या कवीचं गाव आहे हे लोकांना माहीत झाल्यापासून लोक आता या गावाला भेटी देऊ लागले आहेत, तुरळकपणे. पण आता ही गर्दी यापुढे वाढत जाईल. या गावाला पर्यटनस्थळाचं स्वरूप येईल.

कोकणची तांबडी माती. दुतर्फा हिरवी गर्द झाडी रणरणतं ऊन असूनही शीतलता देत होती. पाडाच्या कैऱ्यांचे घोसच्या घोस खुणावत होते. माडांची बनं मनाला लुभावत होती. निसर्ग हा विधात्यानं रचलेला एक अक्षय, चिरतरुण, सदामनोहर असा सुरचित काव्यग्रंथ आहे असं केशवसुत मानतात. खरोखर ज्याला मनमुराद निसर्गसौंदर्य लुटायचं त्यानं कोकणात रमावं. दापोलीच्या तीन-चार वर्षांच्या वास्तव्यात कोकणातलं अभिजात निसर्गसौंदर्य, लोभसवाणी हिरवाई, तांबडे-जांभळे कातळ, लाल रस्ते मी मनात साठवून ठेवलेले; त्यामुळे मराठी साहित्यातून कोकणचं वाचलेलं वर्णन प्रत्यक्ष काही काळ अनुभवलेलं. कोकण हे निसर्गाला पडलेलं सुंदर स्वप्न आहे. ते मनमुराद लुटायला तुमच्याजवळ रसिक वृत्ती हवी. निसर्गाचा ध्यास हवा. मालगुंडचा थांबा लागेपर्यंत नागमोडी वाटेतनं वळण घेत एस. टी. गर्द झाडीतनं पळत होती. रस्त्यातून अधूनमधून दुतर्फा उतरत्या छपराची शाकारलेली घरं खास कोकणची आठवण देत नजरेआड होत होती. परसातल्या केळी, नारळी, पोफळीच्या हिरवाईतळी तांबडी कौलारू घरं दिसतात मोठी छान. गणपतीपुळ्याच्या आधी मालगुंडच्या थांब्यावर बस थांबली. आम्ही मग तिथेच उतरलो. आता केशवसुतांचं घर शोधायचं होतं. गावात तर आलो होतो. गाव अगदी छोटंसं, आटोपशीर असावं हे उतरल्याबरोबर जाणवलं. गावाचा चेहरामोहरा खास कोकणी.

*जागोजाग विराजती चलजले पाटस्थले ती किती*
*केळी नारळी पोफळी फणस ते आंबे तिथे शोभती*
*पक्षी त्यावरूनी नितान्त करिती ते आपुले कूजित*
*स्वप्नी हे बघता फिरूनी, मन हे होते समुत्कण्ठित*

आयुष्याची १५ वर्षे ज्या कोकणच्या रम्य भूमीत गेली त्या भूमीचे संस्कार

केशवसुतांच्या काव्यावर निश्चितच उमटले होते. आपल्या कवितेतून आपल्या मायभूमीचं असं नेटकं वर्णन त्यांनी केलंय. नारळी-पोफळीची आगरं प्रत्येक घराच्या परसदारी दिसत होती. त्यामुळे ऊन्ह असूनही सावलीमुळे उष्मा जाणवत नव्हता. थांब्यावर उभं राहूनच डावीउजवी न्याहाळली. समोरून एका रस्त्याची वाट होती. थोडं पुढं चालत जावं आणि चौकशी करावी असं ठरवून वाट धरली. वाटेत 'मालगुंड एज्युकेशन सोसायटी'चा पत्ता मिळाला. ही इमारत हाकेच्या अंतरावर होती. निरुंद वाटेत झाडांची पानं पडलेली होती. कोकमाची फळे पायदळी आल्याने त्यांचा तांबूस रंग मातीत मिसळला होता. खेड्यातही शहरीकरण होताना एखाद-दुसरं काँक्रीटचं टुमदार घर कौलारू घरातनं डोकावत होतं. परंतु तेही मूळच्या कौलारू घरांची शान राखूनच. आपल्या वेगळेपणाची जाणीव न देता. कोकणच्या कुशीत विसावलेल्या या कवीच्या गावाला न्याहाळत आम्ही चाललो होतो. आम्रवृक्ष आणि नारळी-पोफळींनी बहरलेल्या रमणीय निसर्गसान्निध्यात अगदी समुद्रपातळीला वसलेलं हे चिमुकलं गाव. पार्श्वभूमीला अफाट समुद्र अगदी जवळच. अशा या सौंदर्यदर्शनाने त्यांच्या मनात गाणं आपोआप जागृत झालं नसतं तर नवल. म्हणूनच केशवसुतांना स्वतःच्या काव्याविषयी अशी भावना होती की,

*शारदेने जो मंत्र दिला कानी*
*तसे लिहिले मी काव्य तिचे मनी*

एवढंच नाही तर त्यांच्या वाणीतही सामर्थ्य होतं

*ब्राह्मण नाही, हिंदुही नाही, न मी एक पंथाचा*
*तेच पतीत की जे आखडिती प्रदेश साकल्याचा।*
*मळ्यास माझ्या कुंपण पडणे अगदी न मला साहे !*
*कोण मला वठणीला आणू शकतो ते मी पाहे !*

छे ! मनीमानसी अशी केशवसुतांची कविता भरून राहिलेली. वेळोवेळी तिचे आवर्त त्या त्या विचारासरशी मनात येत होते.

गावातली एक-दोन नागमोडी वळणं पार करून आम्ही मालगुंड एज्युकेशन सोसायटीच्या टुमदार इमारतीशी पोहोचलो. इमारतीकडे जाताना मनात विचार आला, सुट्टी चालू आहे. कोणी भेटेल का इथे ? इमारतीशी पोहोचल्यावर समजलं की ऑफिस उघडं आहे. शिपायाने आम्हाला ऑफिसात नेलं. मी माझा व विजयाबाईंचा परिचय ऑफिसातल्या कर्मचाऱ्यांना करून दिला आणि येण्याचं प्रयोजन सांगितलं. आम्हाला बसायला सांगून त्यांनी चहा मागवला. कोकणी माणसं भारी आतिथ्यशील. दोन दिवसांत त्याचा सारखा प्रत्यय येत होता. पाहुणे पुण्याहून आलेत खास, हे समजल्यावर त्या मंडळींचा उत्साह दुणावला. कर्मचाऱ्यांनी मालगुंड एज्युकेशन सोसायटीचा परिसर हिंडून दाखवला. ही शिक्षणसंस्था मालगुंड पंचक्रोशीतल्या तमाम नागरिकांचं आशास्थान आहे. केशवसुतांचं घर जतन



अनुक्रमणिका

करण्याचं काम ही संस्था करते. या संस्थेचा नुकताच सुवर्णमहोत्सव साजरा झाल्याचं समजलं. वळीराम परकर विद्यालय आणि भाई मयेकर ज्युनि. कॉलेज ह्या दोन संस्था इथल्या ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांचं आशास्थान आहेत. कर्मचाऱ्यांकडून संस्थेची माहिती समजली होती. या संस्थेनं केशवसुतांच्या जन्मस्थानाची जागा विकत घेऊन तेथे मागासवर्गीय मुलांचं एक लहानसं वसतिगृह आणि वाचनालय सुरू केलं आहे. कोकणातल्या ग्रामीण भागातल्या विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासासाठी ही संस्था जिद्दीनं काम करते. पन्नास वर्षांपूर्वी इथे फक्त मराठी सातवीपर्यंत शाळा होती. त्यामुळे इथली मुलं इंग्रजी शिकण्यापासून वंचित राहत. शैक्षणिक प्रगती अशी खुंटलेली होती. त्यामुळे अगतिक झालेली, नाईलाज झालेली, अशिक्षित मुलं पोटापाण्याच्या व्यवसायासाठी मुंबईला जात. ही परिस्थिती बदलण्यासाठी आणि इंग्रजी शिक्षणाची सोय व्हायला पाहिजे, या ध्येयाने प्रेरित होऊन पंचक्रोशीतल्या ग्रामस्थांनी एक कमिटी स्थापन केली. १९४० साली मालगुंड एज्युकेशन सोसायटीची स्थापना झाली. ज्या महाकवीची तुतारी सर्वत्र निनादली त्या कवीचं गाव शिक्षणापासून वंचित होतं. ते काम या सोसायटीनं केलं. एका भाड्याच्या जागेत ४१ सालापासून शाळा सुरू झाली. विठ्ठल केरो मेहेंदळे यांनी उदारपणे अल्पकिमतीत दोन एकर जागा देऊन जागेचा प्रश्न सोडवला. रत्नागिरीचे दानशूर कै. भागोजीशेठ कीर यांच्याकडून इमारत बांधून देण्याचं आश्वासन मिळालं होतं. त्यांच्या आकस्मिक निधनानं इमारतीचं काम अपुरं राहिलं. मालगुंडचे बळीराम परकर पुढे आले. त्यांनी पाच हजार रुपये दिले. ग्रामस्थ देणगीदार व इतरांच्या सहकार्याने १९६१ साली एका मजल्याचं काम पूर्ण केलं. विनायकशेठ गांगल यांनी मूळ जागेपासून थोड्या अंतरावर जमीन दिली. तिथे संस्थेने सहा खोल्या बांधल्या.

आज कवी केशवसुत विद्यालय (जिल्हा परिषद प्राथमिक शाळा) तिथे चालत असून तिथेच बळीराम परकर विद्यालयाचे प्राथमिक वर्ग भरतात. १९६६ साली मालगुंड एज्युकेशन सोसायटी व ग्रामपंचायत मालगुंड यांच्या विद्यमाने कवी केशवसुत जन्मशताब्दी साजरी झाली. पुढे मालगुंड एज्युकेशन सोसायटीने केशवसुतांच्या जन्मस्थळाची सर्व वास्तू व जमीन विकत घेऊन कवी केशवसुतांचं जन्मस्थान सुरक्षित ठेवलं आहे. सामाजिक वनीकरणाची गरज लक्षात घेऊन तेथे मोकळ्या जागेत सुमारे दीडशे माडांची व केळीची लागवड करण्यात आली आहे. ज्युनियर कॉलेजची इमारतही या परिसरात बांधून झाली आहे. अजूनही अनेक उद्दिष्टं आहेत. केशवसुतांचं जन्मस्थान पाहायच्या आधीच बरीच माहिती विद्यालयाचा परिसर पाहत असताना मिळत होती.

आता मात्र उत्तरेकडून तिवरी बंदर (वरवडे) व पश्चिमेला पसरलेला रत्नसागर, त्यामध्ये वनश्रीने नटलेला मालगुंड गाव आणि त्यातलं केशवसुतांचं घर पाहण्याची उत्सुकता शिगेला पोहोचली होती. आणखीही काही माहिती हवी होती. त्यासाठी त्या कर्मचाऱ्यांनी एका शिपायाला विद्यालयाचे मुख्याध्यापक श्री. सदानंद परकर यांच्याकडे निरोप पाठवला.



अनुक्रमणिका







आता आम्ही पायउतार होऊन केशवसुतांच्या घराकडे निघालो. संस्थेच्या मागील बाजूने उताराकडून हे घर जवळ होतं. संस्थेच्या आवारात प्रचंड मोठ्या मोठ्या आम्रवृक्षांनी दाट सावली धरली होती. संस्थेच्या मागचा हा परिसर असा वृक्षराजींच्या सावलीत विसावलेला. पुढेही जागोजाग आम्रवृक्ष, काजू यांनी सावली धरलेली. अवघं औत्सुक्य दाटलेलं. केशवसुतांचं जन्मस्थळ दुरूनच बरोबरच्या कर्मचाऱ्यांनी दाखवलं. आणि बोलेपर्यंत आम्ही त्या घराशी पोहोचलो देखील.

*तो वारा मम जन्मभूमिवरुनी येतो जवे वाहत*
*हे माझ्या हृदयात येऊनि सवे मी ठाकलो चिन्तित*
*माझ्या जन्मधरेचिया मग मनी रूपास मी आणितो*
*तीचे डोंगर उंच खोल, नद्या डोळ्यांपुढे पाहतो.*

असं काव्यपंक्तीतून डोळ्यापुढे केशवसुतांनी आणलेलं त्यांचं जन्मस्थान-जन्मभूमी पुढ्यात होतं.

डाव्या हाताला डेरेदार आंब्याच्या सावलीत विसावलेल्या तीन-चार हजार वस्तीच्या गावातल्या या वास्तूला मी मनोमन दंडवत घातला. फाटक उघडून आम्ही आत शिरलो. 'खेड्यामधलं घर कौलारू' अशा वर्णनाच्या दर्शनी 'मालगुंड एज्युकेशन सोसायटीचे कवी केशवसुत वसतिगृह' अशी पाटी असलेल्या त्या घराच्या ओसरीवर क्षणभर विसावताना आधी लक्ष ओसरीवरील दाराजवळील कवी केशवसुतांच्या फोटोकडे गेलं. दरवाजावर खडूने कोणी कृष्णाजी केशव दामले असं लिहिलं होतं. दुर्दैवाची गोष्टी अशी की या महाकवीचं एकही छायाचित्र उपलब्ध नाही. स्वतःचा फोटो काढण्याच्या ते विरुद्ध होते. मुंबईला असताना त्यांचा तेथील हिंदू मिशनरी सोसायटीचे आद्य संस्थापक कै. गजानन भास्कर वैद्य यांच्याशी परिचय झाला. पुढे त्यांचे बंधू सुंदरराव वैद्य यांच्याशी केशवसुतांची मैत्री जमली. ते प्रसिद्ध शिल्पकार होते. त्यांनी आपल्या स्मृतीच्या आधारे केशवसुतांचे एक चित्र रेखाटले. त्यामुळे उपलब्ध असलेला केशवसुतांचा फोटो हा छायाचित्र नसून ते हे स्मृतिचित्र आहे असेच म्हणावे लागेल.

लहानपणी वर्गातील शिक्षकांनी केशवसुतांना 'दुर्मुखलेला' म्हटलं तेव्हा त्यांच्या मनात आलं आणि त्यांचं मन निभ्रांत रीतीने उद्गारलं,

*माझ्या दुर्मुखल्या मुखांमधुनी या चालावयाचा पुढे*
*आहे सुंदर तो सदा सरसवाङ्‌निष्यन्द चोहीकडे*
*तुम्ही नाही तरी सुतादि तुमचे धातील तो पाहुनी !*
*कोणीही पुसणार नाही, कवी तो होता कसा आननी ?*

आपल्या हातून सरस काव्यनिर्मिती होणार हे स्वतःचं भविष्य जणू त्यांनी वर्तवून टाकलं होतं. त्याचबरोबर हा कवी कसा होता हे कोणी विचारणार नाही, पण सकृद्दर्शनी निष्प्रभ वाटणाऱ्या, ज्याला दुर्मुखलेला म्हणून हिणवलं त्याच या दुर्मुखलेल्या शिष्याच्या

तोंडून कवितेसारखा कधी न आटणारा काव्यौघ व शब्दौघ अव्याहत वाहणार आहे. केवढा स्वाभिमान! कोणीसुद्धा विचारणार नाही की हा कवी कसा होता दिसायला. त्याचा काव्यरसच सर्वजण प्राशन करतील. खरोखर आपल्या अजरामर झालेल्या काव्यानंच त्यांनी चराचराला व्यापून टाकलंय. केशवसुतांच्या फोटोकडे पाहत असताना मनात या विचारांची उजळणी झाली. अंगणात 'कवी केशवसुत जन्मस्थान' अशी पाटी लटकत होती. तीन-चार पायऱ्या चढून आम्ही ओटीवर आलो. अंगण छान सारवलं होतं. ओसरीही. कौलारू घर मोडकळीला आलेलं. ठिकठिकाणी कौलं फुटलेली. मागासवर्गीय वीस-एक विद्यार्थ्यांसाठी हे घर तूर्त वसतिगृह म्हणून वापरलं जात होतं. मे महिन्याची सुट्टी असल्याने तूर्त आत सर्वत्र लाकूडफाटा, सरपण साठवलेलं. पावसाळ्याची बेगमी. घराच्या दर्शनी भिंतीवर 'धीर धरी रे धीरा पोटी। असती मोठी फळे गोमटी', 'देव दानवा नरे निर्मिले' वगैरे केशवसुतांच्या कवितेतल्या पंक्ती लक्ष वेधून घेत होत्या. या भिंतीही सारवलेल्या होत्या.

रत्नागिरीला प्रसिद्ध साहित्यिक मधु मंगेश कर्णिक यांच्या अध्यक्षतेखाली साहित्य संमेलन झालं, त्या वेळी एक साहित्य दिंडी आयोजित करण्यात आली होती. रत्नागिरी दरम्यानच्या प्रवासात कोकणातील साहित्यिकांची जेवढी म्हणून घरं येतील त्या गावांना भेटी देत त्यात आंबेडकर, साने गुरुजी, कवी माधव यांच्या गावांना भेटी देत दिंडी मालगुंडला आली होती. त्याच वेळी या थोर महाकवीचं घर जतन करावं असा निश्चय झाला. रत्नागिरी साहित्यसंमेलनाच्या निमित्ताने दोन संकल्प सोडले गेले. एक म्हणजे कोकण मराठी साहित्य परिषदेची स्थापना आणि केशवसुत स्मारकाची उभारणी. गोष्ट चांगली झाली. आता या वास्तूला खऱ्या अर्थाने जिवंतपणा येईल.

*जन्मस्थान मदीय सुंदर असे त्या माल्यकूटातल्या*
*आनंदे वनदेवता मधुर जी गाने भली गाइल्या*

......................

*वाग्देवीतून जन्मला अपुलिया ग्रामात, या लागुनी*
*जैजैकार करा, सुरा परिसवा हा मंगलाचा ध्वनि*

खरंच किती रमणीय परिसर होता हा. हा 'वाग्देवीचा सुत' या सुंदर ग्रामात जन्मला म्हणून जैजैकार करा. स्वतःबद्दल केवढा गगनाला गवसणी घालणारा आत्मविश्वास त्यांनी या ओळीतून व्यक्त केलाय. जगदुद्धरा नदीच्या तीरावरून येणारे वारे आपल्याला आई-वडिलांचे आशीर्वाद आणतात, अशी रम्य कल्पना ते करतात. आपली बाल्यदशा ज्या गावात घालवली त्या गावाचा सार्थ अभिमानही जाणवतो. प्रिय आप्तांच्या आठवणीनं मन गहिवरतं. परत परत केशवसुतांच्या 'नैऋत्येकडील वारा' या कवितेत शिरायला होत होतं.

१२५ व्या जयंतीनिमित्ताने आता या महाकवीच्या गावाची आठवण होऊन या महाकवीच्या स्मारकाची योजना अमलात यायची चिन्हं दिसू लागली, केशवसुत स्मारक










समितीचे अध्यक्ष श्री. कर्णिक यांनी ही जागा स्मारकासाठी विनाशर्त मिळवली. ह्या घराची पुनर्रचना किंवा पुनर्बांधणी करणार नाही. 'गोष्ट घराकडील मी वदता गड्या रे' सारख्या भावोत्कट कवितेतून घराबद्दलचे संदर्भ लक्षात घेऊन तत्कालीन घराचे पडवी, माजघर, जोतं असे भाग जसेच्या तसे जतन करणार. विशिष्ट प्रक्रियेद्वारे हे घर आहे तसे जपण्याचा प्रयत्न केला जाईल. शिंकाळे, जाते, चुली, सुपं, टोपली, कंदिल या त्या काळातील वस्तूंच्या द्वारे त्या काळातील नांदतं घर दाखवण्याचा प्रयत्न केला जाईल.

घर वगळता उरलेल्या जागेत साहित्यदालन उभारण्यात येणार आहे. अभ्यासिका, साहित्यविषयक कार्यक्रमांसाठी रंगमंच.

'एक खेडे' या कवितेतील भाव प्रकटनामागे निसर्गाविषयीची आदराची भावना केशवसुतांनी प्रकट केलीय. उंच उंच देवळांपेक्षा सृष्टीच्या साधेपणानेच देवत्वाचा साक्षात्कार होईल. तिथला साधेपणाच सुखदायक आहे. द्रव्याची लालसा, कीर्तीची हौस तेथे महत्त्वाची वाटणार नाही. अशा या खेड्यातलं या कवीचं स्मारक निश्चितच वंदनीय होईल. कविवर्य केशवसुतांचं स्मारक पुरोगामी व समतेच्या विचारांचं स्मरण देत राहील. तसेच ते समाजाची सामाजिक व सांस्कृतिक उंची वाढविण्याचं काम करीत राहील, असं प्रतिपादन त्या वेळच्या मुख्यमंत्र्यांनी पायाभरणी समारंभी केलं होतं. युगप्रवर्तक कवी केशवसुतांच्या स्मारकाच्या कल्पनेचं सर्वत्र स्वागत झालं.

दारातून आत शिरताना एक गोष्ट लक्षात आली. दर्शनी भागाच्या भिंतीवर ८ मार्च १८९८ रोजी केशवसुतांनी लिहिलेली 'नवा शिपाई' ही कविता उजव्या हाताच्या भिंतीवर एका कोनशिलेवर लिहून ती कोनशिला भिंतीत बसवली आहे. त्यासाठी त्या भिंतीला सिमेंटचं प्लॅस्टर केलंय. वास्तविक ती भिंत जशी होती तश्शीच ठेवायला हवी होती असं मला वाटलं. ती कोनशिला घरासमोरच्या आवारातही बसवता आली असती. केंबळी, कौलारू घराचं मूळचं सौंदर्य त्यानं थोडं कमी झाल्यासारखं वाटलं, आणि थोडी विसंगतीही दिसली त्यामुळे. या छोटेखानी कौलारू घरात आतल्या बाजूला एक भिंत जमिनीपासून ६-७ फूट उंचीची असून त्याने खोलीचे दोन भाग केलेले. एका बाजूला चूल मांडलेली. बाकी आत सोय अशी काहीच नाही. मागच्या बाजूच्या एका खोलीत ९१ साली ग्रंथालय सुरू करण्यात आलं आहे. माजी न्यायमूर्ती श्री. चंद्रशेखर धर्माधिकारी त्या वेळी उद्घाटक म्हणून आले होते. या ग्रंथालयाला श्री. माधव गडकरी यांनी एक हजार पुस्तके भेट म्हणून दिली आहेत. घराच्या मागील मोकळ्या जागेत उजवीकडे एक बाव आहे. त्यावर रहाट, मागे नारळी-पोफळीची सुमारे दीडशे झाडं लावली आहेत. इथे वसतिगृहातली मुलं भाजीपालाही पिकवतात. कवी केशवसुतांच्या घराचा हा निसर्गाचा परिसर मनाला मोहवत असतानाच लक्ष घड्याळाकडेही होतं.

अजून मुख्याध्यापक सदानंद परकर यांची भेट व्हायची होती. बरोबर असलेल्या कर्मचाऱ्यांचा निरोप घेऊन आम्ही तेथल्या शिपायाबरोबर मुख्याध्यापकांच्या घराकडे

निघालो. 'नैऋत्येकडील वारा' या कवितेतलं मालगुंडचं सगळं वर्णन रस्त्यानं जाताना मनात उजळलं जात होतं. रस्ता शांत होता. काहीही न बोलता मुग्धपणे चालणंसुद्धा कधी कधी आवडतं. त्या शांत मनोवस्थेत आपण चित्रविचित्र खेळ पाहू शकतो. कल्पनारम्य जगात फेरफेटका करून येऊ शकतो किंवा वाचलेल्या गोष्टींचं मननही करू शकतो. पारायणंही.

*जे रम्य ते बघुनिया मज वेड लागे*
*गाणे मनात मग होय सवेचि जागे*
*गातो म्हणूनि कवनी फुलपाखरा ते*
*व्हायास सौख्य मम खिन्न अशा मनाने*

केशवसुतांच्या सृष्टीविषयक दृष्टिकोनाचा अर्थ उलगडायला या चार ओळी पुरेत.

*पुष्पामधे प्रकट होय न गे जराही*
*सृष्टीत एकही रहस्य असे न काही*

जीवनाचे रहस्य सृष्टीत प्रगट होते. शोधता येते. सृष्टीला दैवत मानणाऱ्या या कवीने तीपासून स्फूर्ती घेऊन काव्याचा नजराणाच रसिकांना दिला.

मालगुंडचा मुख्य रस्ता लागला. गावाची माहिती हवी होती म्हणजे आता तोंडाची टकळी सुरू करायला हवी होती. गावाला एकच रस्ता होता. तोच बाजारपेठेचा रस्ता की संपलं गाव. रस्त्यानं दोन्ही बाजूला आंबा-नारळ तर कुणाकुणाच्या परड्यात सुपारी, माड डोलत होते. रस्त्यावरच्या एका झाडाला छान फणस लगडले होते– लेकुरवाळ्या आईसारखे. कोकणचं हे वैभव असं तृप्त मनानं निरखत मुख्य रस्ता बाजूला ठेवून उजवीकडे आतल्या वळणावर मुख्याध्यापकांच्या घराचा रस्ता होता. घर जरा आतच वाटलं. पण त्या निमित्तानं गावाला प्रदक्षिणा झाली. सदानंद पारकरांचं घर छान होतं. ऐसपैस घरावर आंब्यानं शीतल सावली धरलेली, अंगणातच उतरवलेल्या आंब्याच्या आढ्या लागलेल्या. मी पुण्याहून आल्याचा निरोप त्यांना मिळाला होता. त्यांनी स्वागत चांगलं केलं. थंड पाणी घेतल्यावर थोडी ओळख वगैरे करून घेतल्यावर मला हवी असलेली माहिती मी विचारायला उत्सुक झाले. नेहमीच चिकित्सक वृत्तीने विचारपूस करायची सवय असल्याने मी त्यांना विचारलं, "तुमच्या या मालगुंडमध्ये केशवसुतांचं स्मारक ज्या घरात होतंय ते नक्की त्यांचंच घर हे कशावरून? कारण त्यांच्या जन्मशताब्दीच्या वेळी तर ते महत्प्रयासानं शोधून तिथं समारंभ साजरा केला होता."

'तुम्ही विचारताय ती फार चांगली गोष्ट आहे. पण तुम्ही दुरून आलात तर आधी सरबत वगैरे घ्या,' असं म्हणत असतानाच पुढ्यात हापूस आंब्याच्या फोडी, फणसाचे गरे आणि कोकमाचं थंडगार सरबत असा खास कोकणी पाहुणचार आला. या पाहुणचाराचा आस्वाद घेतच आता हवी होती ती माहिती मी लक्षपूर्वक ऐकत होते. मालगुंडमध्ये विष्णू केशव जोशी हे प्राथमिक शिक्षक होते. ते 'रत्नभूमी', 'बलवंत' मधून लिहीत. आता ते हयात नाहीत. त्यांना



अनुक्रमणिका






निश्चितपणे माहीत होतं की याच घरात कवी केशवसुतांचा जन्म झाला. त्यामुळे हे निश्चित झालं की तेच ते घर. वासिष्ठी नदीच्या डाव्या तीरावर वसलेल्या या गावात फडके यांचं हे घर केशवसुतांच्या वडिलांनी– केसोपंत दामल्यांनी भाड्याने घेतलं होतं. ते इथे त्या वेळी शिक्षक होते. पुढे फडके यांनी ते घर वाळव्यांना दिलं. वाळवे हे त्यांचं संरक्षित कुळ म्हणून लागलं. केशवसुतांच्या जन्मशताब्दी वर्षात फडके यांनी हे घर देण्यास नकार दिला. नाही तर त्याच वेळी इथे केशवसुतांचं स्मारक झालं असतं. आपलं वडिलोपार्जित घर देण्यास फडक्यांनी नकार दिला, पण त्याच जागेत मांडव घालून आम्ही जन्मशताब्दी साजरी केली. पुढे हे घर आणि त्याभोवतीची जागा ताब्यात कशी आली हा फार मोठा किस्सा आहे. पण बक्षीसपत्राने ही जागा मिळाली. ती मालगुंड एज्युकेशन सोसायटीने वाळवे यांच्याकडून विकत घेतली. घरही. हे घर आणि ही जागा आता मालगुंड एज्युकेशन सोसायटीकडे आहे. आम्ही विनाशर्त ही जागा स्मारकासाठी दिली आहे. केशवसुतांचे नातू पुण्यात असतात. त्यांनी केशवसुत स्मारकासाठी पाच हजार रुपये दिले आहेत.'

सरदार मेहेंदळे यांचं गाव असलेल्या या गावात केशवसुतांचं हे घर मोठं स्मारक म्हणून जतन होईल. सव्वाशे वर्षांपूर्वीच्या ह्या घराचा परिसर आता नव्या दिमाखात उभा राहील. आता या गावात केशवसुतांचे कोणीच नातेवाईक नाहीत ही माहितीही परकरांकडून समजली. केशवसुतांचे पूर्वज मूळचे रत्नागिरीच्या जवळ कोळंब गावचे. खुद्द कोळंब्याहून हे घराणं केसोपंतांच्या पूर्वी एक दोन पिढ्या चिपळूणजवळील सोनगाव या गावी येऊन स्थायिक झालं. सोनगाव हा गाव प्रसिद्ध मंडलिक घराण्याचा खोती गाव. हा गाव वासिष्ठी नदीच्या डाव्या तीरावर परशुराम क्षेत्राच्या डोंगराच्या पायथ्याशी वसलेला. केसोपंत चिपळूणला शिक्षक होते. त्यांनी निवृत्त व्हायच्या आधीच नोकरी सोडली. दापोली तालुक्यातील 'वळणे' हे मंडलिकांचं खोती गाव. या गावाची व्यवस्था पाहण्यासाठी त्यांनी केसोपंतांना योजलं. 'एक खेडे' या कवितेतील हेच ते गाव. केशवसुत भावंडांत पाचवे. एकूण भाऊ सहा. जन्म आणि बाळपण मालगुंड या गावी गेलं. पुढे शिक्षणाच्या निमित्तानं मराठी अभ्यासक्रम इथं पार पडल्यावर बडोदा, वर्धा, पुणे अशी भ्रमंती झाली. मॅट्रिक परीक्षा पास झाल्यावर मुंबई, सावंतवाडी, खानदेशात भडगाव, पूर्व खानदेशात सावद्याजवळ फैजपूर, नंतर हुबळी-धारवाड अशी नोकरीच्या निमित्तानं अनेक गावं झाली. शिक्षकी पेशाच्या केशवसुतांची वृत्ती कविमनाची होती. वयाच्या अवघ्या चाळीशीत प्लेगमुळे हुबळीत ते मृत्युमुखी पडले. जन्मभर त्यांना संसारासाठी पैशाची तोंडमिळवणीच करावी लागली. सुरुवातीस त्यांच्या कविता 'मासिक मनोरंजन' मधून प्रसिद्ध होऊ लागल्या. चाळीस वर्षांच्या अवघ्या आयुष्यात त्यांनी १३९-४० कविता लिहिल्या.

*भिकार या जगी इच्छित न मिळे काही*
*म्हणुनी तुझे पायी भिक्षांदेही*











सर्व आयुष्यक्रम कष्टामध्ये काढावा लागला. त्यामुळे त्यांच्या काव्यातून कधी असे स्वानुभवाचे उद्‌गार निघाले तर नवल नाही. तरी पण केशवसुतांचा स्वभाव प्रौढ वयात अनेक प्रकारच्या काळज्यांमुळे जरी आनंदी किंवा उल्हासी नसला तरी विद्यार्थिदशेत जेव्हा ते सुट्टीत कोकणात वळणे या गावी येत तेव्हा आपल्या लहान भावंडांशी हसण्या-खेळण्यात आणि स्वतःच्या कविता वाचून दाखविण्यात गर्क असत.

*टिप फुले टिप भासे गडे ग !*
*फुलांची पखरण झिप*

ही कविता त्यांनी आपल्या धाकट्या बहिणीकडून पाठ करून घेतलेली. घराभोवती इतकी फुलझाडं की त्या फुलांची पखरण सदैव अंगणात असे. खरंच केशवसुतांची सांपत्तिक स्थिती आयुष्याच्या उत्तरार्धात चांगली असती आणि त्यांना आणखी आयुष्य मिळालं असतं तर त्यांच्या हातून आणखी कविता सरसपणे लिहून झाली असती. विचार मनात येऊ लागले. वेळ खूप झाला होता. आम्ही सदानंद परकर यांचा निरोप घेतला. ध्येयनिष्ठ अशा या शिक्षकाला नुकताच राज्यपुरस्कार मिळाला आहे, हेही ओघात समजलं. निघताना स्मारकाचा समारंभ होईल तेव्हा जरूर या असं निमंत्रणही त्यांनी दिलं.

आता परतीची वाट होती. आम्रवृक्ष, नारळी-पोफळींनी बहरलेल्या रमणीय निसर्गसान्निध्यात समुद्रसपाटीवर वसलेल्या मालगुंडचं दर्शन रमणीय होतं. मालगुंडची नदी पार करून 'काजरघाटी' चढण्याकरता पावलं झपाझप उचलून घाटी चढून सपाटीला आलं की मागे वळून पाहतानाच मालगुंडचं दर्शन मनाला भुरळ घालणारं. नारळी-पोफळीची गर्द आगरं, हिरव्या झाडीतली कौलारू घरं आणि पश्चिमेकडे निळा अथांग सागर. काजरघाटीच्या माथ्यावरचं हे दृष्य एखाद्या कुशल चित्रकाराच्या चित्रात रेखाटल्यासारखं.

आता आम्ही गणपतीपुळ्याकडे निघालो. फक्त मधला पूल पार करायचा होता. पश्चिमेला पसरलेला लांबलचक रत्नसागर आणि दक्षिणेला गणपतीपुळं. रिक्षातून अवघ्या ७-८ मिनिटांच्या आत पोहोचलोही. मालगुंड आता मागे राहिलं होतं. पुढ्यात होता फेन-धवल समुद्र आणि आकाशाची अथांग निळाई.

*माझ्या जन्मघरे पुढे दिसतसे वाराही विस्तीर्ण तो*
*त्याचे रम्य तरंगताण्डव पुनः पाहुनि आल्हादतो*
*जे हृदम्य तरंगताण्डव मला तैशापरी वाटते*
*अज्ञेयावरती जसे क्षणिक हे अस्तित्व हो खेळते*

जन्मगावाजवळ पसरलेला हा विस्तीर्ण सागरही आठवणींनी असा सांद्र झाला आहे. तेव्हा प्रवास करणाऱ्या या बालवयात कवीला दैवतांनी झोप आणण्यासाठी गाणी गायली होती.

*गाणी जी म्हटली मला निजविण्या वारिस्थ देवीगणी*
*त्यांचे सूर अता अलौकिक असे जे वात हा आणितो ॥*

केशवसुतांच्या या काव्यपंक्ती या रत्नसागरापुढे खळाळत येत होत्या.

कोकणच्या निसर्गाचं असं अभिजात सौंदर्य या कवीच्या काव्यात असं शब्दबद्ध झालंय. कोकणची भूमी मोहक-वेधक आहे. तिचं मराठी साहित्यात पडलेलं प्रतिबिंब हे असं निखळ आहे.

गणपतीचं दर्शन घेऊन जेवण केलं आणि वाळूत क्षणभर विसावलो. लाटांचं नर्तन क्षितिजापर्यंत विस्तारलं होतं. चमचमणाऱ्या त्या अगणित लाटा सुखवत होत्या. वाळूत विसावल्यावर मनात आलं, दहा वर्षांपूर्वी इथे आले होते तेव्हा किती शांत होता हा परिसर. आता नुसती गर्दीच गर्दी. त्या सुशीतळ सागर किनाऱ्यावर मन शांतावलं होतं. पण आजूबाजूच्या गर्दीची जाणीव होत होती. सगळी शांतता नष्ट झालीय. केशवसुत स्मारक झाल्यावर ह्या गर्दीचा ओघ मालगुंडमधलं स्मारक पाहायला वळेल. त्या गावाचं मूळचं रूप मग पालटून जाईल का ? 'खेड्यामधले घर कौलारू' असलेलं गाव, असं हे गाव त्या वेळी कसं दिसेल ? तर्क खूप आले मनात पण मनात हेही आलं- त्याआधीचं हे गावाचं रूप मी जे मनात साठवलंय ते माझ्या मनःपटलावर कायम तसंच राहील. भविष्यात ते कसंही होवो. पाचूच्या बेटात, हिरव्या वनराईत, आमराई, नारळी पोफळीतलं ते माल्यकूट– मालगुंड मला मात्र हवं होतं तसं भेटलं होतं.

(२४/ऋणानुबंध, डी. पी. रोड, औंध, पुणे ७.)

**महाराष्ट्र साहित्य पत्रिका**

वृत्तपत्र नोंदणी कायद्यानुसार (नमुना ४, नियम ८) द्यावयाची माहिती

| | |
|---|---|
| **प्रसिद्धीचे ठिकाण** | महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३० |
| **प्रसिद्धीचा नियतकाल** | त्रैमासिक |
| **मुद्रक आणि प्रकाशक** | डॉ. गं. ना. जोगळेकर |
| **पत्ता** | महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३० |
| **राष्ट्रीयत्व** | भारतीय |
| **संपादक** | वि. स. वाळिंबे |
| **पत्ता** | महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३० |
| **राष्ट्रीयत्व :** | भारतीय |
| **नियतकालिकाची मालकी :** | महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता पुणे ४११ ०३० |

मी असे जाहीर करतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहितीप्रमाणे बरोबर आहे.

**डॉ. गं. ना. जोगळेकर**

प्रकाशक










डॉ. आनंद पाटील

# लोकसाहित्यावरील कृतिसत्राच्या निमित्ताने एक वादळ

## लोकसाहित्याभ्यासाच्या नव्या दिशा

म्हैसूर येथील सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्वेजीस व गोवा विद्यापीठाच्या समाजशास्त्र विभाग यांच्या वतीने लोकसाहित्याभ्यासाचे प्रशिक्षण देणारे एक आठवड्याचे कृतिसत्र डॉ. विली डी'सिल्वा यांच्या नेतृत्वाखाली गोवा विद्यापीठात नुकतेच पार पडले. निवडक पंचवीस अभ्यासक-संशोधक व तीन तज्ज्ञ यांच्या कृतिसत्रात सहभागी झालो असता मराठी माणसाच्या अस्मितेला (ती नक्की कशी असते कोण जाणे— असलीच तर?) धक्का बसणारे एक-दोन प्रसंग उद्भवले. या लेखाचा मांड मराठी भाषा व संस्कृतीच्या पताका, दिंड्या-पालख्या वगैरे मिरवणाऱ्यांचे पितळ उघडे करणाऱ्यांचे अभिप्राय मराठीतूनच कळण्यासाठी मांडला आहे. परप्रांतीय इंग्रजीत बोलतात (ते आपणाला कळत नाही म्हणून जवळचे वाटतात, महाराष्ट्राचे खरे मालक तेच?) तर तो प्रसंग असा—

म्हैसूरचे सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडिया (महाराष्ट्रात शैक्षणिक क्षेत्रात 'सेंट्रल' काहीच कसे नाही?) मधील लोकसाहित्यशास्त्रज्ञ (Folklorist) डॉ. जवाहरलाल हान्डू भारतभर लोकसाहित्याची उपेक्षा कशी होत आहे यावर पोटतिडकीने बोलत होते. लिखित वाङ्मयाच्या आधारे ब्रिटिशांनी भारतात वसाहतवाद उच्चभ्रूंच्या आधाराने घट्ट केला. आता नववसाहत काळातही या परिस्थितीत फारसा फरक पडलेला नाही. दोन-तीन राज्यांचा अपवाद वगळता लोकसाहित्याचा शास्त्रशुद्ध अभ्यास कुठेही होत नाही. 'तुम्ही महाराष्ट्राचे उदाहरण मुळीच घेऊ नका. तुमच्या शेजारचे एवढे श्रीमंत, मोठे व तथाकथित पुरोगामी म्हणवणारे हे राज्य. त्यांच्याकडे लोकसाहित्याच्या अभ्यासाचे प्रगत प्रशिक्षण घेतलेला एकही तज्ज्ञ नाही. त्यांच्या एकाही विद्यापीठात लोकसाहित्य शिक्षण-संशोधनाचा खास विभाग नाही. नाव घेण्यासारखी एकही स्वतंत्र संस्था नाही, संग्रहालय नाही.'

"माफ करा डॉ. हान्डू, आमच्या दुर्गा भागवत..." मी मध्येच हस्तक्षेप केला.

"येस, आय नो. शी इज अ गुड स्कॉलर, सरोजिनी बाबरांनी लोकगीतं, कहाण्या वगैरे संग्रह केलेत. प्रभाकर मांड्यांना मी पत्र पाठवलं होतं. त्याचं उत्तरच मिळालं नव्हतं," हान्डूंनी दुसरी थप्पड लगावली.










"गंगाधर मोरजे, द. ग. गोडसे..."मी मराठी मावळ्यांची फौज पुढे उभी करू लागलो. हसत हान्डू म्हणाले,

"असे अनेक अभ्यासक मराठीत असतील. ते व्यक्तिगत पातळीवरचे प्रयत्न आहेत. सगळे मराठीत संग्राहकच ठरतात. वर्गीकरण व विश्लेषणाच्या आधुनिक पद्धतींचा परिचय त्यांना कितपत आहे ? इंग्रजीत त्यांनी जे फुटकळ लिहिलंय त्याला फारसा अर्थ नाही."

तोंडात मारल्यासारखा मी गप्प बसलो. महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीच या गृहस्थाने गाडून टाकली. सुधाकरराव नाईकांचे रामटेकचे संस्कृत विद्यापीठ प्रकल्प शरद पवारांनी बाजूला सारले ते बरे झाले. हान्डूंचा सल्ला त्यांच्या कानी महानोरांनी घालायला हवा. लोकसाहित्य प्रशिक्षण केंद्र स्थापन करून 'हिस्ट्री फ्रॉम बिलो' घडवल्याचे श्रेय घ्या. महाराष्ट्रात लोकवाङ्मयात डॉक्टरेट मिळवणारे सुमन पाटील, शिंदे, जाधव, वाकोडे, जगताप वगैरे अभ्यासकांची हान्डूंनी एका फटक्यात कत्तल केली. सगळ्यांना संग्राहक ठरवले. तेही कागदी घोडे नाचवणारे ? लोकसाहित्याचे संग्रहालय नसणारे बेवारशी संशोधक ? डॉ. घुर्ये जन्मशताब्दी उत्सवाची तयारी वायाच गेली म्हणायची. डॉ. अशोक रानडे, परांजपे, ढेरे, पंडित वगैरे शास्त्री मंडळींचीही त्यांनी वासलात लावली. बाप रे हा एवढा विद्वान आहे तरी कोण ? 'जवाहर' नावाला राजकीय रंग दिसतात. या कन्नडिगाने महाराष्ट्र-कर्नाटक सीमावाद कृतिसत्रात कृतीत आणल्याचा संशय मला आला. (तसे मी समारोपाच्या वेळी स्पष्ट सांगितले. हान्डू कश्मिरी ब्राह्मण असल्याचे नंतर कळले ! हा युरामेरिकनाईज्ड गुलाबी गडी लोकसाहित्याच्या अभ्यासकात वडा दादा असल्याचे उमगू लागले. तो पुरोगामी विचारांचा, खिलाडू वृत्तीचा आणि रंगेलही आहे.) सांस्कृतिक संचिताचे हे वादळ माझ्या डोक्यात घोंगावत राहिले. 'दगडांच्या' माझ्या देशात लोकसाहित्य एवढे उपेक्षित का राहिले ? फोर्ड फौंडेशनकडे अर्ज गेले नाहीत म्हणून ? विद्यापीठे उच्चवर्णीयांच्या ताब्यात होती. त्यांचे मातीशी नाते तुटले होते म्हणून ? की विद्यापीठ अनुदान मंडळाकडे इंग्रजीत प्रस्ताव सादर करणारा एकही जातिवंत भूमिपुत्र नव्हता म्हणून ? का अभिजन अभिरूची बिघडवण्याचे बळ लोकसाहित्यात येण्याची भीती शास्त्री-पंडितांना वाटली ? हान्डू तर लाखो रुपयांचे फंड उपलब्ध असल्याची माहिती देत होते. त्यांच्या संस्थेच्या प्रकाशनाच्या यादीत मराठी लोकसाहित्यावरचे एकही पुस्तक तयार झालेले नाही. डिग्री व डिप्लोमा घेतलेल्या एकाही महाराष्ट्रीय विद्यार्थ्याचा उल्लेख नाही. एवढ्या लहान गोव्यातील दोन तरुणी म्हैसूरला हान्डूच्या मार्गदर्शनाखाली लोकसाहित्यातील एम्. ए. व डिप्लोमा करून आलेल्या. त्या कृतिसत्राला हजर होत्या. स्वतःच्या उपक्रमांची माहिती आत्मविश्वासाने देत होत्या. कोकणीत त्यांनी काही पुस्तके प्रसिद्ध केलीत.

मी शरमिंदा झालो. लंडन, मॉरिशसला जागतिक मराठी परिषदा भरवून



अनुक्रमणिका







नववसाहतवाद पोसणाऱ्यांचा निषेध करावासा वाटला. ते फंड अशा कामाकडे का बरे वळत नसावेत? शरदराव-महानोरांना या योजना कुणी समजावून सांगितल्या नसतील. अजून वेळ गेलेली नाही. मनाची समजूत घालण्याचा मी प्रयत्न करीत होतो एवढ्यात दुसरा दणका बसला.

डॉ. विली डि'सिल्वा कोकणीतील लोकसाहित्य संग्राहकांची माहिती देऊ लागले. बंगलोरपासून मुंबईपर्यंत पश्चिम किनारपट्टीतील ख्रिश्चन अभ्यासकांची व अन्य काही नावे त्यांनी तपशिलाने सांगितली. (बेंगलोर ते बॉम्बे पश्चिम किनारपट्टीचे वेगळे राज्य करण्याचे स्वप्न अनेकजण बोलण्या-लिहिण्यातून मांडत असतात याची नोंद पुण्या-मुंबईच्या पंडितांनी आणि पुढाऱ्यांनी घ्यावी. बोली भाषांची उपेक्षा लवकर थांबली नाही तर जिल्हाविभाजनाप्रमाणे असे तुकडे पडायला काय हरकत आहे? माझ्या मराठाची बोलु कवतुके, आपुली पगडी सांभाळावी!) मराठीचे वाचन विलीने केले नसेल. तो धर्मोपदेशक असल्याने त्याला त्याच्या क्षेत्रातीलच माहिती असणे रास्तच आहे. या मित्राच्या माहितीला मी पुस्ती जोडली. गोव्यातील विनायक खेडेकरांचा मराठीतील लोकसरिता हा संग्रह कला अकादमीने नुकताच प्रसिद्ध केलाय. (महाराष्ट्रात स्वतंत्र कला अकादमी नाही. सरकारी समित्या असंख्य आहेत.) प्रा. फळदेसाई यांनी गोमन्तकीय लोकवाद्यावर ग्रंथ लिहिल्याचे मी सांगितले. पण विलीने सरकारचा प्रतिसाद मिळत नसल्याचा उल्लेख केला. मराठी दहा-पंधरा वर्षांत गोव्यातून जाईल, असे भविष्यही वर्तविले. हा भाषिक वाद सीमाभागाचा आणि गोव्यातील सांस्कृतिक जीवनाचा एक अविभाज्य घटक बनला आहे. तौलनिक साहित्याचे अध्यापन करत असल्याने अशा वादात पडायचे नसते, फक्त विश्लेषण करायचे, हे तुलनाकाराचे पथ्य मी सांभाळतो. ब्रिटिश व पोर्तुगीज वसाहतवादाने आपल्या साहित्य व संस्कृतीत स्वातंत्र्योत्तर नववसाहतवादी काळातही किती प्रचंड गुंता करून ठेवला आहे याची कल्पना येण्यासाठी हे तपशिलाने मांडावे लागत आहे. कला व साहित्य स्वायत्त समजणाऱ्यांचे हस्तिदंती मनोरे अशा परिस्थितीत कोसळू लागतात. गोव्यातील सर्वच भाषकांचे लोकसाहित्य जमा करण्याचा मानवतावादी सल्ला हान्डूंनी दिला. संकलनपद्धती, संचय, वर्गीकरण व विश्लेषणावर खूप खल झाला.

वसाहतवादी विरोधाभासाचे उदाहरण म्हणजे देशी लोकसाहित्याची समग्र चर्चा इंग्रजीतून झाली! भारतीय बांधवांशी संपर्क माध्यम इंग्रजीच राहणार अशी दक्षिणेकडच्या राज्यांची ठाम भूमिका आहेच. तिथे इंग्रजीचे प्राबल्य असल्यामुळेच ही मंडळी लोकसाहित्यात आपले प्रादेशिक स्वत्व शोधण्यात आघाडीवर आहेत हा दुसरा एक विरोधाभास! हान्डूंनी अल्पवेळात जागतिक पातळीवरील लोकसाहित्य अभ्यासाचा आराखडाच संक्षेपाने मांडला. मंगेश पाडगावकरांच्यासारखाच दिसणारा बुर्ल्गोनिन कट्वाला हा कश्मिरी कुशल अध्यापक आहे. लोकसाहित्याच्या शास्त्रशुद्ध अभ्यासाचा










पाया फिन्लान्डसारख्या गरीब राष्ट्राने घातला. या देशावर जर्मनी, रशिया, स्वीडन वगैरे देशांनी कित्येक वर्षे राज्य केले. फिनिश लोकांच्या सांस्कृतिक अस्मितेच्या अस्तित्वाचाच गंभीर प्रश्न निर्माण झाला. हंगेरीतही तशीच परिस्थिती निर्माण झाली. (फिनिश भाषा भारतीय भाषांना जवळची आहे हे विशेष.) लोकांचे आत्मभान चेतवायला देशी चिन्हांची गरज होती. एक डॉक्टरच लोकसाहित्याचे संकलन करू लागला. या वेडात त्याने वैद्यकीय व्यवसायच सोडून दिला. लोनहार्टने गीत-कथांचे तुकडे जमा केले. त्यातूनच कालेवाला हे त्यांचे खंडकाव्य तयार झाले. राष्ट्रीय अस्मिता या कहाण्यांनी जागी केली. त्यानेच रशियाच्या पकडीतून या राष्ट्रांची सुटका केली असे म्हटले जाते. लोनहार्ट तौलनिक साहित्याचा प्राध्यापक झाला. हेल्सन्की हेच आज जगभरच्या लोकसाहित्य संशोधकांचे माहेरघर मानले जाते. नाना अभ्यास पद्धती याच केंद्राने शोधल्या. नवी परिभाषा प्रचारात आणली. ते लोकसाहित्य तीर्थस्थान बनले.

लोकसाहित्याच्या परिभाषेचा परिचय इंग्रजीतून होत असता मराठी प्रतिशब्द लवकर आठवत नव्हते. तौलनिक, ऐतिहासिक, भौगोलिक, संरचनावादी, मानसशास्त्रीय वगैरे अभ्यासपद्धती हान्डू खुसखुशीत विनोद करीत, जगभरातील लोकसाहित्याची उदाहरणे देत समजून सांगत. स्वतःला माहीत नसलेले नवे मुद्दे स्वीकारीत. मार्क्सवादी दृष्टीने लोकसाहित्य अभ्यासायला हरकत नाही. रशिया मोडला तरी मार्क्सवाद राहणार म्हणणारा हा भिडू आहे. प्रॉप, लेव्ही, स्ट्रॉस, फूको, वगैरे सिद्धांतवाद्यांची नावे इंग्रजी भाषेचा व वाङ्मयाचा अभ्यास करताना वाचनात आली होती. लोकसाहित्याच्या अभ्यासात विशिष्ट पद्धतीच वापरून सिद्ध केलेले मराठी पुस्तक काही आठवले नाही. दुर्गाबाई लोकसाहित्याच्या रूपरेषेत पंडिती वळणातच अडकून पडल्याचे पटू लागले. गोडशांचा शाक्तभार लोकधाटी उलगडण्यास अपुरा वाटू लागला. मांडे-मोरजांची लोकसाहित्याची वर्गवारी बाळबोध भासू लागली. एवढा सारा उत्पात हान्डूंच्या डझनभर व्याख्यानांनी घडवला. विचारांचे खरे वादळ उठवले ते त्यांच्या 'मौखिक संहितांचे (डिसकोर्स) भारतातील स्थान' या विषयावरील आवेशपूर्ण भाषणाने. त्याचा सारांश पुढीलप्रमाणे : "मौखिक संभाषण संहिता (डिसकोर्स) ही उत्तर-आधुनिक समीक्षेत सध्या जोराचा वादविषय ठरलेली संकल्पना आहे. वसाहतकालीन व वसाहतकालोत्तर लिखित संहिताच्या तौलनिक अभ्यासातच तज्ज्ञ गुरफटले आहेत. भारतात या वादाचे पडसाद उमटू लागलेत. परंतु मौखिक संहिताकडे मात्र पूर्णपणे अक्षम्य दुर्लक्ष झाले आहे. भारतीय समाजरचनाच परंपरेने (व स्वभावानेही) सरंजामी आहे. सर्वसामान्यांच्या मौखिक संहिताकडे लेखकांचे लक्ष १९२० च्या सुमारास जाऊ लागले. त्यापूर्वी वाङ्मय-व्यवहार राजेरजवाडे नि शास्त्रीपंडितांच्या वाड्यातच अडकून पडले होते. भारतीय भाषेतील शब्दही या श्रेणीबद्धतेचे सांकेतिक अर्थ लेवून येतात. पृथ्वीमाता ही अन्नदात्री; ठाकूर पूजा वगैरे प्रकारात संस्कृत











संहितांचे वर्चस्व स्पष्ट होते. ब्राह्मणी मौखिक-लिखित संहितांचा अर्थ लावायला मध्यस्थीची गरज भासते. 'टीकाकार' आणि 'व्याख्याकार' यांची 'दलाली' चालू राहते. आपल्या समाजाचे 'दलाला'शिवाय पान हालत नाही, हे मान्य केले पाहिजे! आजसुद्धा 'दलाला'शिवाय न्यायालयातील भाषा समजत नाही. हा अराजक अंधःकार हटवण्याच्या चळवळी होतात. पण त्या लवकरच थंडावतात, कारण त्या आंधळया धर्मश्रद्धेच्या लंगड्या पायावर उभ्या राहतात. ऐतिहासिक निकष लावून तपासणी करा. प्रमाणित मौखिक/लिखित संहितांची परंपरा भाट-भटजींनी सुरू केली. ती तशीच थोड्याफार फरकाने आजही सुरू आहे. तिने केंद्राकडेच दुर्लक्ष केले. कोणत्याही संहितेचे केंद्र हे बहुसंख्य लोकांचेच असायला हवे. मौखिक/लिखित संहितांच्या रेट्यानेच युरोपचा इतिहास बदलून टाकला. चांगले बदल घडवले. त्यांनी धार्मिक रूपकात लोकसाहित्याचे मिश्रण केले. आजही तज्ज्ञ तेच करत आहेत. भारतात असे कधी घडलेच नाही. कप्पेबंदीने कूपमंडूक तयार केले. सगळेच बुडून मेले. मढ्याच्या टाळूवरचे लोणी विधीपूर्वक पळवणाऱ्यांचे प्रस्थ वाढले.

भूमिकांची अदलाबदल समाजाचे आरोग्य नीट टिकवायला मदत करते. आपण मात्र ती निषिद्ध मानतो. लिखित संहितेपेक्षा भारतीय मौखिक संहिता सर्वसामान्य जनतेच्या समस्यांसंबंधी अधिक संवेदनक्षम असल्याचे दाखले इतिहासात अनेक सापडतील. पण त्यांना सरंजामी रूपकांच्या अडथळयातून प्रवास करावा लागला. अभिजात ग्रंथांनी जो घोळ घातला तो अधिक खेदजनक आहे. कारण या अभिजात संहितांच्या ज्ञानाचा वापर सत्ता म्हणून होऊ लागला. नॉलेज इज पॉवर. हेच ज्ञान अडाणी लोकांच्या विरुद्ध शस्त्रासारखे वापरले गेले. त्याला विधी-संकेतांचे रूप मिळाले. त्यात सर्वसामान्य जनतेला सहभागी करून घेण्यात आले नाही. येथल्या उच्चवर्णियांनी बहुजनांचे शोषण करण्यासाठी ते वापरले. ज्ञानच औपचारिक बनले. ज्याच्यात बहुसंख्य लोकांचा सहभाग नसतो ते ज्ञान खऱ्या शक्तीचे रूप धारण करूच शकत नाही.

उलट लोकसाहित्याला दलालांची मुळीच जरुरी नसते. ते सर्वांचेच धन असते. त्यात लोकांचा सहभाग जसा असेल तसा या लोकधारेचा प्रवाह वळण घेत जातो. याला लोकवेदही म्हणतात. समग्र मूल्य व्यूह रचनेचीच संहिता बनते. मला अभिजात संगीत हा अडाणीपणाचा उत्तम नमुना वाटतो. त्यात जनतेचा वाटा मुळीच नसतो. अभिजात संगीत आणि नृत्य शिकणारे व ऐकणारे/पाहणारे कोण असतात ? ऐदी-ऐतखाऊ नागर लोकांचे हे उद्योग आहेत. मुख्य सांस्कृतिक प्रवाहापासून तुटलेल्यांचे ते एक वेगळे बेट असते. भारताचा सांस्कृतिक इतिहास आपण पूर्णपणे बदलू शकत नाही. पण संहितेचे समग्र चित्र रेखाटायचे असेल तर असंस्कृत मौखिक संहितेचा समावेश त्यात केल्याशिवाय ते अपुरेच राहणार. भारतीय संहितेचा विचार समग्र स्वरूपातच झाला पाहिजे. तरच मौखिक/लिखित संहिता सत्तास्पर्धेत कशा वापरल्या जातात याचा नीट उलगडा होऊ शकेल. प्रमुख वैशिष्ट्ये अशी :

(१) लिखित संहिता ज्या समस्यांकडे दुर्लक्ष करतात त्यांच्याशीच नेमक्या मौखिक संहिता अधिक संबंधित असतात. मौखिक संहितेतही विशिष्ट मूल्यव्यूह अभिप्रेत असतो. परिकथांचा अपवाद वगळता समग्र मौखिक साहित्य संहिता लोकांच्या जीवनातील प्रातिनिधिक समस्यांशी संबंधित असल्याचे सिद्ध झाले आहे.

(२) मौखिक संहितेत जनांचा सहभाग मोठ्या प्रमाणावर असतो. उलट संस्कृत संहितांची मक्तेदारी प्रस्थापित झाली. ती पुरोहितवर्गाने सत्तेचे साधन म्हणून वाढवली. तिला मर्यादा पडल्या. उलट मौखिक संहिता विस्तारल्या, बदलत राहिल्या. त्यांची मक्तेदारी निर्माण झाली नाही.

(३) मौखिक संहितांत ज्ञान होते, पण त्याचे शक्तीत कधीच रूपांतर होत/झाले नाही. देशाच्या इतिहासात त्यांचा वापर सत्तेचे साधन म्हणून झाल्याचे उदाहरण शोधून सापडत नाही. त्या संहिता व्यक्तिवादी/केंद्री (इंडिव्हिज्युअलाईज्ड) कधीच झाल्या नाहीत. उलट लिखित संहिता सदैव व्यक्तिनिष्ठ दिसतील. लेखकपण याचा अर्थच पैसा व सत्ता कमावण्याचा धंदा होय. पण मौखिक संहिताकाराला अशी कुठलीच सत्ता मिळवायची नसते. तिच्यात अनेकांचा सहभाग असल्याने त्या एककेंद्री नसतात. उलट लिखित संहितांचा वापर निवडक लोक सत्तेसाठी करत असल्याने बहुसंख्य लोकांच्या अपेक्षांची पूर्ती कधीच करत नाहीत. वैफल्य वाढवण्यास त्या हातभारच लावतात.

(४) मौखिक संहितेसाठी विशेष प्रशिक्षण-पदव्यांची जरुरी नसते. सहभागातून त्या तयार होतात. त्या अनौपचारिकही असतात. त्यांना लेबलांची गरज नसते. त्या उपेक्षित राहिल्याने त्यांच्या नशिबी दारिद्र्य आले. वसाहतवादाने त्यांना नष्ट करण्याच्याच योजना राबवल्या. त्यांचे 'योग्य प्रकारे' संवर्धन, संकलन, संचय करणे ही बाब आज महत्त्वाची आहे."

हान्डूंचे दीड तासाचे व्याख्यान (अध्यापन) ऐकून मला ब्लेकचे एक वचन आठवले, 'शहाणपण अशा घाणेरड्या बाजारात विकले जाते की, जिथे कुणी गिऱ्हाईक जात नाही.' त्यांचे मुद्दे आज वसाहतवादी लेखनावरील शेकडो इंग्रजी ग्रंथ न वाचलेल्या अप्रशिक्षितास 'उथळ व उद्धट' वाटण्याचा संभव आहे. माझे आकलन तपासण्यासाठी 'ग्रामीण' लेखक या नात्याने शेवटी मी त्यांच्या मुद्द्याला पुष्टी देण्यासाठी विचारले,

"महाराष्ट्रात ग्रामीण, दलित, जनवादी वगैरे लेखकांनी लिखित संहितांचे स्वरूप बरेच बदलले आहे. त्यामुळे मौखिक संहिता पारंपरिक संस्कृतकरण व इंग्रजीकरण झालेल्या संहितांत मिसळून चांगले रसायन तयार होईल की नाही ?"

तात्काळ तो तज्ज्ञ उत्तरला,

"ग्रामीण व दलित चळवळी कर्नाटकातही जोर धरत आहेत. ही चांगलीच चिन्हे आहेत. पण त्या बाबी लिखित संहितांच्या विरोधात राजकीयीकरण होऊन आल्यास घोटाळे

संभवतात. त्यात समग्र लोकसाहित्याचे प्रतिध्वनी किती आढळतात ते पाहा. मौखिक संहितांचे सत्त्व घेऊन त्या उभ्या राहिल्या तरच टिकाव धरू शकतील. लिखित संहितांची शक्ती मोठी असते. संघर्षात मौखिक संहिता दुबळी ठरते. ती पहिलीशी समबलशाली करण्यासाठीच तर हा प्रशिक्षणवर्ग भरवला आहे ?

माझ्या मनात विचार आला, हान्डूंच्या कसोट्या लावून अस्सल ग्रामीण, दलित वगैरे साहित्यातील लोकसाहित्य घटक संगणकावर तपासले तर ब्रिटिशांच्या संपर्कानंतरचे समग्र 'आधुनिक' मराठी साहित्यच 'उपरे' ठरण्याचे संकट कोसळेल. गोव्यातील इंग्रजी-मराठी कादंबऱ्यांच्या दोन नमुना उदाहरणांतील लोकसाहित्यिक घटक मी या कृतिसत्राआधीच तपासले होते तेव्हा पदरी घोर निराशाच पडली होती. हान्डूंच्या चर्चेनंतर माझ्या **मराठी नाटकावरील इंग्रजी प्रभाव** या विषयावरील संशोधनातील निष्कर्षांना पुष्टी मिळत असल्याचे पाहून समाधान वाटले. मला इंग्रजी अभ्यास मंडळाच्या बैठकीला हजेरी लावायला जायची परवानगी मागताच हान्डू म्हणाले,

"अवश्य जा. इंग्रजीच्या अभ्यासक्रमातही भारतीय लोकसाहित्याचा एक पेपर सक्तीने ठेवा. परकीयांची हमाली किती करतात हे लोक ?"

"मग शेक्सपिअर-पूजा बंद पडेल ना ?" मी प्रतिप्रश्न केला.

"ज्यांना ती करावयाची असेल त्यांना इंग्लंडला पाठवा." हान्डूंनी असे म्हणताच हास्याचा स्फोट झाला. लोकसाहित्यमय झालेली अशी ही कश्मिरी वल्ली.

त्यांचे जोडीदार अमृतसरच्या गुरूनानक विद्यापीठातील डॉ. बाजवा. सरदारजी शांत, संयमी, गंभीर तर काश्मिरी बाबू अवखळ हीरो. दोघेही सकाळी दहा वाजता वातानुकूलित सभागृहात यायचे. विलीचे संयोजन शिस्तबद्ध होते. दीड वाजता सभागृहासमोरच उभे राहून जेवण घ्यायचे. अडीच ते साडेचार दुसरे सत्र त्याच गतीने पार पडायचे. हे तिन्ही मार्गदर्शक सर्ववेळ खुर्चीत थांबायचे हे विशेष. प्रशिक्षणार्थी गळाटू लागले, पण तज्ज्ञांचा उत्साह शेवटपर्यंत कायम टिकून राहिला. तिघांनी तीन विषय वाटून घेतले होते. डॉ. बाजवांचा विषय 'लोकसाहित्याची चिन्हमीमांसा' हा होता. तिन्ही मार्गदर्शकांना युरोप-अमेरिकेत प्रशिक्षण मिळाले होते. त्यांनी परिषदा-मेळाव्यांच्या निमित्ताने जगभर अनेकवेळा प्रवास केलेला. त्यांचे विवेचन संकल्पनांच्या पातळीवर जाताच प्रशिक्षणार्थींची दमछाक होई.

### लोकसाहित्याची चिन्हशास्त्रीय मीमांसा

केईर एलमच्या **द् सेमियॉटिक्स ऑफ थिएटर अँड ड्रामा** या ग्रंथाचे वाचन मी काही कामानिमित्त पूर्वी केले होते. चिन्हमीमांसेचा परिचय असणारा एकही प्रशिक्षणार्थी नव्हता. या पार्श्वभूमीवर चिन्हमीमांसेत वापरल्या जाणाऱ्या संकल्पना इंग्रजीत समजावून देऊ











लागले. अवकाश आणि पृथ्वीवरील चिन्हव्यवस्थेचा गुंता विशेष अभ्यासाशिवाय लक्षात येणे शक्य नव्हते. मूर्त वस्तू आणि अमूर्त संकल्पनांना विशिष्ट अर्थ चिकटत जातात. त्याचे विश्लेषण करण्याचे शास्त्र म्हणजे चिन्हमीमांसा. अभिव्यक्तीची प्रक्रिया चिन्हांचे कार्य समजावून घेण्यावर अवलंबून असते. ऐतिहासिक भाषाशास्त्रीय विवेचनांच्या मर्यादा जाणवताच भाषावैज्ञानिकांनी नव्या अभ्यास पद्धतीचा शोध सुरू केला. चिन्ह व ध्वनीच्या संयोगातून निर्माण होणाऱ्या अर्थाकडे त्यांचे लक्ष वेधले गेले. मुळात भाषाविज्ञानातील हा एक गंभीर विषय आहे. लोकसाहित्यातील विविध प्रकारांचा उलगडा करण्यासाठी ही अभ्यासपद्धती फार उपयुक्त असल्याचे बाजवांच्या ग्रंथ विवेचनातून जाणवत होते. पण मराठी लोकसाहित्यातील अनेक नमुन्यांची चिन्हमीमांसा कुणी केल्याचे आठवत नव्हते.(या संदर्भातील माझ्या वाचनाला मर्यादा पडणे शक्य आहे. भारतीय पातळीवर मराठी लोकसाहित्याभ्यासाचा दर्जा स्पष्ट होण्यासाठीच हा लेख लिहिला आहे. मराठीत बरेच भ्रम संकुचित वृत्तीने पोसले जातात ते खरे की खोटे याचाही उलगडा या निमित्ताने व्हावा हा प्रमुख उद्देश आहे)

धार्मिक विधी, क्रियाकर्मात असंख्य खुणा, वस्तू वगैरेंचा वापर सदैव होत असतो. त्या सर्वांचा अर्थ आपणास कळलेला असतोच असे नाही. शिवाय संदर्भानुरूप चिन्हांचे अर्थ बदलतात. त्यांची विशिष्ट रचना व क्रम असतात. त्यांचे तर्कशास्त्रीय संबंध असतात, पातळ्या संभवतात. श्रद्धाही त्यांना चिकटलेल्या असतात. ढगांचा गडगडाट व विजांचा कडकडाट धोक्याचा इशारा देतात. काही चिन्हे मूक असतात. लोकसाहित्यात त्यांची विपुलता आढळते. प्रत्येक चिन्हाचा अर्थ लावत गेल्यास समग्र समाजाच्या सांस्कृतिक कर्मकांडांचा उलगडा चांगल्याप्रकारे होऊ शकतो.

उदाहरणार्थ, दोरीवरच्या नृत्यात बांबूचा आधार घेतला जातो. मन व शरीराच्या एकाग्रतेचा प्रत्यय त्यात येतो. नाट्य-नृत्य वगैरे सर्व प्रकारचे प्रयोग या संतुलनावरच अवलंबून असतात. त्यात आदिम निर्मितिक्षमता व मानसशास्त्रीय रचनांचा संबंध प्रस्थापित झालेला असतो. प्रयोग व प्रेक्षकांच्या संबंधात बिघाड झाल्यास अभिव्यक्तीत अडथळा संभवतो. वास्तवाचे आकलन या दोन्ही घटकांच्या जुळणीवर अवलंबून असते. रामलीलेच्या प्रत्येक नव्या प्रयोगात नव्या रचनांची शक्यता असते. त्यात बदल होत राहतात. नाना तऱ्हा संभवतात. हे घटक कधीच स्थिर नसतात. प्राक्‌कथांचे साचे मात्र त्यात शोधता येतात. त्यातील घटक वेगळे काढून त्यांच्या प्रतिकांचा अर्थ लावावा लागतो. अतिभौतिक कल्पना त्यातून स्पष्ट करता येतात. आदिबंधांची सुसंगत मांडणी त्यात आढळते. हावभावाचे माध्यम शरीर असते. त्याद्वारे वर्तनाचे ढाचे स्पष्ट होतात. दुसरे उदाहरण पंजाबी नकलेचे घेऊ. लोककलेच्या या प्रकाराची चिन्हमीमांसा पुढच्या तासाला करू. नकलेच्या अनेक प्रयोगांचा तुलनात्मक अभ्यास करून काही वैशिष्ट्येच निश्चित करता



अनुक्रमणिका

येतात. प्रत्येक प्रयोगात तिचे रूपांतर होत असते. सार्वत्रिक हावभाव व आलंकारिक अभिव्यक्तीचे आकलन होण्यासाठी चिन्हमीमांसा उपयोगी पडते. मानवशास्त्रीय साधनांच्या आधारे ज्ञानात्मक अर्थ व सामाजिक संदर्भ जुळवावे लागतात. प्रयोगात भाषिक माध्यमांचा, शाब्दिक अभिव्यक्तीचा व चिन्हांचा वापर होत असतो. वेष, रंगभूषा, प्रतिके, वगैरे सांस्कृतिक संदर्भ घेऊन येतात. उदा. नटराजाची मूर्ती काय सुचवते? विशिष्ट अर्थाच्या संकेतांचा तो खेळ असतो. १) चिन्हमीमांसा, २) अर्थविचार, ३) फलप्रामाण्य अशा पातळ्यांवर सामुदायिक अभिव्यक्तीचा अभ्यास करावा लागतो. समजा आपण कोंबड्यांची झुंज पाहत असता. तेव्हा नेमकी कोणती प्रतिक्रिया प्रेक्षकाच्या मनात घडते? प्रयोग अभ्यासकांच्या मते प्रेक्षक त्या झुंजीची चिन्हसंहिता (सेमिओ टेक्स्ट) स्वीकारतात. त्या जगताशी (वर्ल्ड) संवाद साधतात.

डॉ. बाजवांची चर्चा संकल्पनाच्या विवेचनात गुंतत गेली. प्रशिक्षणार्थींना प्राथमिक स्वरूपाचे ज्ञान असल्याचे गृहीत धरून ते बोलत होते. **द सेमियॉटिक्स ऑफ पंजाबी बर्थ रिच्युअल, द सेमियॉटिक्स ऑफ पंजाबी फोक थिएटर** असे इंग्रजी ग्रंथ व बरेच शोधनिबंध या तरुण सरदारजींच्या नावावर आहेत. मराठी लोकसाहित्यावर या दर्जाचा एकही ग्रंथ इंग्रजीत नाही याची खात्री त्यांची पुस्तके चाळताना वाटू लागली. गरोदरपणाची विदेही चविष्ट चर्चा करणाऱ्या कहाण्या-कथा मराठीत ढीगभर सापडतील. भारतीय पातळीवर कुणी संशोधक भारतीय लोकसाहित्याचा तौलनिक अभ्यास इंग्रजीतून करू लागला, तर तो मराठी लोकसाहित्याचा कसा विचार करणार? पुण्या-मुंबईच्या पोकळ पंडितांनी वाजवलेल्या पुंग्यांचे सूर पकडूनच संशोधन करणार. मला मिशिगन विद्यापीठाला सादर केलेला अब्राम्सचा तमाशावरचा इंग्रजी प्रबंध आणि केंब्रिजच्या रोझॅलिंड ओ' हॅनलॉनचा महात्मा फुल्यांच्या सत्यशोधकी लोकवाङ्मयाचा व्यासंग आठवला. सत्यशोधकी वाङ्मयाचा शोध घेण्यासाठी ती अजून महाराष्ट्रात येत असते. हे दोन्ही गोरे संशोधक मराठी शिकलेत. पण सर्व भारतीय भाषांवर प्रभुत्व मिळवून तौलनिक ग्रंथ सिद्ध करणे कठीणच. संपर्कासाठी इंग्रजीकरण अटळ वाटू लागले. विलीमार्फत अभ्यासकांनी सूचना केल्यामुळे बाजवांनी चिन्हमीमांसेचा बाळबोध परिचय करून देण्यात एक तास खर्ची घातला.

१९ व्या शतकात युरोपात चिन्हमीमांसेचा उदय झाला. फ्रेंचांनी सेमियॉलॉजी म्हणून ते आकारास आणले. अमेरिकन अस्मितेने त्याचे सेमियॉटिक्स केले. चार्ल्स पीअर्स, फर्दिनंद द सस्तूर वगैरे सिद्धांतवाद्यांनी त्यात नवी भर टाकली, वगैरे इतिहास सांगून, चिन्ह, प्रतीक, मूर्ती वगैरे संकल्पना, त्यांचे वर्गीकरण करण्याच्या पद्धती वगैरे तपशील पुरवला. नैसर्गिक चिन्हे, मानवाने तयार केलेली चिन्हे व अनुमानित चिन्हांच्या गहन चर्चेचा आढावा घेणे स्थलाभावी इथे शक्य नाही. चिन्ह विश्वातील अवकाशात वस्तू आपले स्थान बदलतात.

तशा रचनाही बदलतात. त्यांच्या बोधनासाठी रेखांकन करावे लागते. परस्परसंबंधांवर चिन्हांची व्यवस्था अवलंबून असते. रस्त्यांच्या नकाशाप्रमाणेच चिन्हांची स्थूल रूपरेषा मांडावी लागते. चिन्हांचे जाळे उलगडले तरच समग्र संहितेतील घटक वेगळे करता येतात. स्वतंत्र मूलभूत संहिता कधीच अस्तित्वात असत नाही. प्रतिध्वनी संहिताच तयार होत असतात, हा सिद्धांत आता सर्वमान्य झाला आहे. संहितेतून चिन्हे वेगळी काढून त्यांचे विश्लेषण करण्यात येते. ज्युलिया क्रिस्टोवाच्या मते, प्रत्येक संहिता ही पूर्वसंहितांच्या प्रतिध्वनींनी युक्त असते. त्यामुळे आंतरसंहितात्मकतेचा शोध अपरिहार्य ठरतो. तर लेव्ही स्ट्रॉस म्हणतो की, प्रत्येक संहिता ही जुनी घोंगडी, टेबल क्लॉथ वगैरेंचे सातत्य टिकवणारी एक गोधडीच असते. त्यांना 'रॅग टेक्स्ट' किंवा ब्रीकोलीज (briecolees, bricologe) म्हणावे. त्यांच्या घटकांची ओळख करून घेऊन कार्य निश्चित करण्यास चिन्हमीमांसा उपयोगी पडते. सर्व संहिता ही एक प्रकारे भाषांतरे व रूपांतरेच असतात. डेरिडा, फुको वगैरे उत्तर-आधुनिकतावाद्यांनी संहितेची तुलना अहम् (इगो)शी केली आहे. आंतर-संहितात्मकता ही आंतर-व्यक्तिमत्त्वासारखीच असते. त्यामुळेच संहितेच्या अभ्यासात पुरातत्त्वविद्येचा समावेश केला जातो. चिन्हमीमांसा ही खगोलशास्त्रासारखीच एक अभ्यास पद्धती आहे. ग्रह व ताऱ्यांचे विश्व बनले आहे. तसेच चिन्हांचे जाळे मौखिक/लिखित संहितात विणलेले असते. चिन्हव्यवस्था संहितेत कशी कार्य करते याचा उलगडा चिन्हमीमांसेतच सूक्ष्मपणे होऊ शकतो.

वरील सैद्धांतिक मांडणी अधिक स्पष्ट करण्यासाठी बाजवांनी पंजाबी जन्मविधीवर एक व्याख्यान दिले. त्यात आकलनसुलभ वर्णनाचा भाग फारच कमी होता. कहाण्या नि आस्वादक भोंगळ विवेचनाला सरावलेल्या अभिरुचीला त्यांचे सैद्धांतिक विवेचन रुचणारे नव्हते. गरोदर स्त्रीला उंबरठ्याच्या आत बंदिवासातच राहावे लागते. तेव्हा घरातले विश्व व बाहेरच्या विश्वात अंतर पडते. नव्या प्राण्याचा जन्म हीच एक संहिता बनते. जीवन सातत्य दर्शविणारे समारंभ होतात. मुलाचा जन्म झाल्यानंतर मातेचेच रूपांतर होते. ती नवी भूमिका स्वीकारते. तेव्हा बंदिस्त जगात अनेक अतिभौतिक बाबी आढळतात. दुष्ट शक्तीपासून संरक्षणासाठी तिच्या अंथरुणाखाली चप्पल, विळा, कोयता अशा वस्तू ठेवल्या जातात. अशा चिन्ह व्यवस्थेला विशिष्ट अर्थ असतो. समारंभ, मनोरंजन, प्रयोग यांच्याद्वारे एक पवित्र अवकाश निर्माण केला जातो. बाह्य जगातील सावळ्या गोंधळापासून अर्भक आणि मातेचे संरक्षण करण्यासाठी बंदिवासात काही कडक नियम अमलात येतात. चार भिंतीबाहेरच्या दुष्ट शक्तींचे अस्तित्व सुचवणारी चिन्हे आढळतात. वंशवृद्धी, जन्म व मृत्यू सूचक अनेक चिन्हे व विधींचा समुच्चय तयार होतो. सृजनाचाच तो सोहळा असतो. बारसे, बाशिंग ते बाराव्यापर्यंत आढळणाऱ्या चिन्हे व विधींच्या व्यवस्था परस्परविरोधी आढळतात. वांझ स्त्री मृत्यूचेच प्रतीक बनते. मृत्यूची भीती सर्वांनाच असते. शेतकरी समाजात असे विधी व चिन्हे

प्रसुती काळात अधिक प्रमाणात वापरात आलेली दिसतात. त्यांची यादी मोठी आहे. पंजाबी कुटुंबातील जन्मविधी व चिन्हांचा सैद्धांतिक शोध घेण्यासाठी बाजवांनी स्वतंत्र ग्रंथच इंग्रजीत सिद्ध केला आहे. एरवी साध्या वाटणाऱ्या वस्तूमागे कितीतरी चिन्हार्थांचे जाळे उभे असते याचा उलगडा हा एक चैतन्यदायी प्रवास होता. एकच सूत्र पकडून किती सखोल संशोधन करता येते याचा हा उत्तम नमुना होता.

लोककलांच्या चिन्हमीमांसेवर इंग्रजीत स्वतंत्र ग्रंथ लिहिल्यामुळे त्यांचे 'अभिनयाची भाषा' या विषयावरचे व्याख्यान चांगले रंगले. मराठी नाट्यसमीक्षा अभिजात अभिनयपरंपरेच्या आणि भरतमुनींच्या पंचात अडकून पडल्याचे दिसते. तिचा प्रवास लोककलातील अभिनयाच्या सैद्धांतिक विश्लेषणापर्यंत व्हायला काही शतके थांबावे लागेल. हावभाव-अभिनयाच्या भाषेच्या चक्रात जमात–इतिहास–पात्र–लोककला अशी मांडणी बाजवांनी केली. प्रथम त्यांनी मौखिक नाट्य व नृत्याच्या प्रयोगांचे विवेचन केले. संबागा आदिवासी जमातीच्या कायको नृत्याचे उदाहरण फार बोलके वाटले. अखंड वर्षभर चालणारा हा उत्सव असतो. रात्रभर आखाड्यात नृत्य चालते. सकाळी त्याच जागेत बाजार भरतो. अनेक वस्तूंचा विनिमय होतो. नृत्याकाराला अधिक उलाढालींचे रूप कसे प्राप्त होते ? काही लोककला प्रकार धार्मिक विधीकडून रंगभूमीकडे व रंगभूमीकडून पुन्हा धार्मिक विधीकडे असा प्रवास करताना दिसतात. सांबांच्या उत्सवाला येणाऱ्या पाहुण्यांना डुकराचे मांस खायला घालून आगतस्वागत होते. पाहुणा मात्र त्या बदल्यात भेटवस्तू देऊन जातो. आर्थिक समतोल असा साधला जातो. रंगभूमीशी बाह्य वास्तवाचा सांधा असा जुळवला जातो. मनोरंजनाचा शेवट अन्नप्राशनाने होतो. ज्याचा प्रारंभ रंगभूमीवर होतो त्याचा शेवट जमातीच्या हितरक्षणात होतो. पाश्चात्य देशातील पॅजियन्टस्‌चे ढाचे असेच आढळतात. लोककलाच आधुनिक नाटकाला 'नवता' प्राप्त करून देतात. आपल्या पंडिती नाटककारांना हे भान ब्रेख्त व पिरांदेल्लो वाचून आले हे आमचे दुर्दैव. आमच्या गावच्या जत्रेचा नवा अर्थ बाजवांच्या व्याख्यानानंतर उमगू लागला आणि मराठी तमाशातील 'बतावणी' पंजाबी 'नकले'च्या कुळातली वाटू लागली.

पंजाबात प्रत्येक कुळाचा एक भांड किंवा मिराशी ठरलेला असतो. हे लोककलावंत त्या कुळातील उत्सवप्रसंगी अनेक नकला सादर करतात. जन्म, लग्न अशा समारंभप्रसंगी त्यांचे कार्यक्रम् होतात. नकलेचे पूर्वरंग व उत्तररंग असे दोन भाग असतात. दोन मिराशी कधी पद्यातून तर कधी गद्यातून कथानकांचे चुटके विनोदी पद्धतीने सादर करतात: एकाच्या हातात चाबूक असतो. व्हिक्टर रस्किनच्या **डिस्कोर्स ऑफ लाफ्टर** च्या आधारे बाजवांनी नकलेच्या तीन नमुन्यांचे विश्लेषण केले. चिन्हे व अभिनय पाहून प्रेक्षक हसतात तेव्हा एक संहिता उलगडत जाते. तिचे भाषिक घटक वेगळे काढावे लागतात. त्या संहितेचे नियंत्रण संहितेतील प्रेक्षकच करीत असतो. समाजाचा सहभाग हे तिचे वैशिष्ट्य असते.










अभिनय सिद्धांतानुसार हावभाव ही सामाजिक निर्मिती असते. सुप्तपणे जातपात, पंथ वगैरे घटकही त्यांचे नियंत्रण करतात. त्याचेही राजकारण सादरीकरणात डोकावते. प्रयोगाचे मानसशास्त्रीय विवेचन ही एक वेगळी अभ्यासशाखा आहे. हावभाव ही एक भाषाच असते. नृत्यात निधर्मी व धार्मिक अभिव्यक्तींची भेसळ आढळते. प्रयोगात आश्रयदात्याची उपस्थिती ही आर्थिक व्यवस्थापनाची चिन्हेच असतात. कार्नव्हलच्या उत्सवाची संहिता त्या दृष्टीने तपासण्यासारखी आहे. आपले संवेदनच ती संहिता निर्माण करत असते. पर्यायाने आपल्या अस्तित्वाचीच ही चिन्हमीमांसा असते.

**कुलस्वामी नियमावली व लोकसाहित्य :** जर्मनीतील हायडेलबर्ग विद्यापीठाची समाजशास्त्रातील पदवी मिळवलेले गोवा विद्यापीठातील डॉ. विली डी'सुझा यांचा प्रमुख विषय 'लोकसाहित्यातील अर्थक्रियावाद' हा होता. मानवशास्त्रीय पद्धती वापरून 'कुलस्वामी नियमावली'चे लोकवाङ्मयातील महत्त्व सोदाहरण स्पष्ट केले. विली समाजशास्त्र विभागप्रमुख आहे, तसाच तो ख्रिस्ती पाद्रीही आहे. या दोन भूमिकांचा परस्परसंबंध तपसण्याची संधी या निमित्ताने मिळाली. ब्रिटिश व अन्य युरोपीय देशांतील धर्मोपदेशकांनी भारतात पूर्वी मानवशास्त्रात कार्य केले त्याचे संदर्भ वसाहतवादी होते. त्याचा साक्षेपी आढावा हान्डूंनी घेतला होता. त्या पार्श्वभूमीवर विली आपल्या विषयाची मांडणी कशी करतो याची उत्सुकता होती. विलीचा व्यासंग व वक्तृत्व प्रभावी आहे. तो प्रथम भारतीय असल्याने त्याचे सामाजिक भान चांगले आहे. त्याची उदाहरणे बंगलोर व गोव्याशी निगडित होती. पितृसत्ताक व मातृसत्ताक कुटुंब पद्धतीतील निषिद्ध शरीरसंबंधांचा तुलनात्मक आढावा त्याने तपशिलाने घेतला. तुळू भाषा संस्कृतोद्भव तर कोकणी इन्डो आयर्न कुळातील आहेत. लोककथांतं निषिद्ध शरीरसंबंध टाळण्यासाठी अनेक क्लृप्त्या वापरल्या गेल्या आहेत. समुद्रातील विशिष्ट जातीचे दोन मासे एकाच भांड्यात शिजवले जात नाहीत. ती लोककथा विलीने इंग्रजी व कोकणीचा वापर करीत छान सांगितली. माशासंबंधीच्या लोककथांचा व गीतांचा वेगळा संग्रह विश्लेषणासह निघावा.

रजस्वला व ऋतुमतीच्या संदर्भात असे बरेच संकेत आहेत. त्या विषयीच्या कथांचा व गीतांचा उद्‌बोधक आढावा त्याने घेतला. इंग्रजी शिक्षणामुळे रजस्वला स्नानविधी काळाच्या पडद्याआड जात आहेत. त्यांच्या संहिता अद्याप कुणीच प्रकाशात आणलेल्या नाहीत. लग्न विधीच्या वेळी ख्रिश्चन समाजात एक पद्यमय दीर्घ लोककथा प्रचलित आहे. तिचे अवशेष विलीने गोळा केले आहेत. लग्न लागण्याच्या आधीच्या रात्री अखंड बारा तास ही लोककथा गाण्याची प्रथा ग्रामीण भागात आजही आढळते. नारळाच्या रसाचे स्नान वधूवरांस घालण्याचा हा विधी सुरू होतो, तेव्हा 'कदंबा'ची (राजा) ही पद्य कहाणी लोककलाकार वाद्यांच्या साथीने कथन करू लागतात. ती ऐकण्याची परवानगी लहान मुलांना असते. पण वयात आलेल्या मुलामुलींना बंदी असते. तिला 'दुरूत रायली कानी'











तसेच 'कदमाली नारी' अशी शीर्षके आहेत. काही संग्राहकांनी त्या प्रसिद्धही केल्या आहेत. विलीने मंगलोरमध्ये प्रत्यक्ष पाहणी करून एका संहितेचे ध्वनिमुद्रण केले आहे. तिचा सारांश असा :-

दुरूत हा राजकुमार. गोयातील थोर कंदबराय राजाचा पुत्र. पवळाचा हा नातू. एक दिवस तो शिकारीला गेला, पण शिकार काही मिळाली नाही. जवळपास कुठेच पक्षीही दिसेना. तहानेने तो व्याकूळ झाला. एका जागी बाण मारून त्याने तळे केले. तो पाणी प्यायला वाकताच त्याला एका पक्ष्याचे प्रतिबिंब दिसले. त्या पक्ष्याच्या सौंदर्याने तो मोहित झाला. पक्षी त्याला म्हणाला, "माझ्या सौंदर्यावर तू एवढा भाळलास. जवळच एक राजवाडा आहे. त्याच्या सातव्या मजल्यावर एक सुंदरी राहते. तिला पाहिल्यास तू काय करशील ?" राजकुमार परततो. मातापित्यांना त्या सुंदरीशीच लग्न करण्याचा बेत सांगतो. कदंबराय बोलणी करायला जातो. पण त्या राजकुमारीची लग्न न करण्याची प्रतिज्ञा. ती तपस्विनी असते. कायम नग्न राहून ती तपश्चर्या करत असते. पूजेसाठी एक तरुणी रोज तिला फुले द्यायला येते. फुलाइतकेच राजकुमारीचे वजन भरण्याची अट कायम असते. तपस्विनीचे वजन तेवढेच भरते. कदंबरायाचा लग्नाचा प्रस्ताव फेटाळल्याने तो युद्ध करायला सज्ज होतो. पुत्र त्याला आवर घालतो. स्वतः राजवाड्यावाहेर पडतो. प्रथम आपल्या मेहुण्याच्या घरी येतो. मेहुणा युद्धावर गेलेला असतो. तो कुमार आपल्या बहिणीकडे तिची वस्त्रे व भूषणांची मागणी करतो. नवरा जिवंत असता बहीण नाकातील नथ त्याला देऊ शकत नाही. नवरा काय म्हणेल ? अखेर भाऊ तिची समजूत घालतो. तिचा वेष घालून बाहेर पडतो. रस्त्यात नेमका मेव्हणाच पत्नीचा संशय घेऊन आडवा येतो. राजुकमार त्याला सगळी हकिकत सांगतो. "मी तुझी बायको नाही. मला पत्नी आणायची नाही. तुमच्या घरी दासी आणायची आहे. बोडकी आणायचीय." स्त्री वेषात तो त्या राजवाड्यात जातो. रोज फुले घेऊन जाणाऱ्या मुलीच्या आजीला वश करून घेतो. त्या मुलीच्या प्रमाणे फुले राजकुमारीला देण्याचे काम मिळवतो. 'सातव्या' दिवशी तिने (त्याने) विणलेला फुलांचा हार पाहून राजकुमारी म्हातारीच्या नातीला भेटायची इच्छा व्यक्त करते. तो राजकुमारीबरोबरच सातव्या मजल्यावर राहू लागतो. एक दिवस राजकुमारी त्याचे (तिचे) राकट हात बघते. विचारते, 'आजीचे नाते गे हासता कसे ?' असे विनोदी संवाद होतात. 'दोघी' एकत्र झोपतात. उष्टे खातात. नंतर नेहमीप्रमाणे फुले घेऊन मुलगी येते. पण राजकुमारीचे वजन फुलाएवढे भरत नाही. राजा संतापतो. त्याच वेळी 'तो' महाराच्या वेषात राजवाड्यापुढे पावा वाजवत येतो. तिलाही महाराशीच लग्न करण्याची शिक्षा झालेली असते. ती राजवाड्यातून बाहेर पडते. त्या बासरीवाल्या महाराबरोबर निघून जाते. तो आपली खरी ओळख सांगतो. ती दासीसारखी त्याच्या बहिणीच्या घरी राहायला आनंदाने तयार होते आणि शेवट गोड होतो.

विलीने १९७१ साली बंगलोरच्या जवळपास ध्वनिमुद्रित केलेल्या या










गीतलोककथेचा सारांश सांगून दडपलेल्या बळीराजाला पुन्हा राजपद मिळण्याची सुप्त इच्छा या लोककथेत प्रकट झाल्याचे सविस्तर विवेचन केले. या कहाणीची स्थलनिश्चिती त्याने केली होती. प्रश्न होता तो कालनिर्श्[illegible]. तो प्रश्न मी उपस्थित केला. तेव्हा ही लोककथा पोर्तुगीजपूर्व काळातील असण्याची श्क्यता त्याने वर्तविली. मग गेल्या साडेचारशे वर्षांत या कथानकाच्या कोकणी निवेदनात भाषिक संस्कृतीकरणाचा एकही अंश कसा आढळत नाही ? सर्व पात्रे, प्रसंग व भाषा हिंदू संकेत कटाक्षाने पाळताना दिसतात. ख्रिश्चन समाजात ती अजून का टिकून आहे ? अशा प्रश्नांना वेळेअभावी उत्तरे मिळाली नाहीत. वसाहतवादी विरोधाभास व उपरोधाचे अनेक नमुने मी पाहिले होते. पण असा विलक्षण नमुना आढळला नव्हता, म्हणून त्याचा तपशील पुरवला आहे. संस्कृतीकरणाच्या या भोवऱ्यात गरगरत राहिलो. लोककथांचा तौलनिक अभ्यास झाल्यास किती तरी सांस्कृतिक साम्य-भेदांचा उलगडा होईल असे वाटू लागले.

'फळाफुलांच्या व प्राण्यांच्या कथांतून व्यक्त होणाऱ्या संबंधाच्या लोककथा' या विषयाच्या स्पष्टीकरणासाठी विलीने आफ्रिकेतील लोकसंकेतांचे उदाहरण दिले. शिकारीला निघण्यापूर्वी आफ्रिकन जमाती काही विधी करतात. झाडाखाली एक कोकरू बांधून ठेवतात. मिळेल ती शिकार सर्वांनी वाटून घ्यायची असते. एकजण छोटा प्राणी मारून चोरून खातो. त्याच्या चेहऱ्यावरूनच चोरीचे गुपीत उघड होते. सर्व जमात विनोदी कहाण्या सांगून त्याला हैराण करते. तो पळून जातो व माकडासारखा झाडावर लपून बसतो. अखेर समुदायाला शरण येतो.

'भोपळा व पडवळाची कहाणी' मानव व निसर्गातील बदलत्या संबंधांची अवस्थांतरे स्पष्ट करते. विस्तारभयास्तव ती इथे देत नाही. निषिद्ध शरीरसंबंधाचे ते एक उत्कृष्ट उदाहरण आहे. जॅक डेरिडा व रोलंड बार्थेसच्या सैद्धांतिक विवेचनामुळे लेखकाचा मृत्यू घडला आहे. साहित्य ही एका व्यक्तीची मक्तेदारी असलेला 'स्वान्त सुखाय' प्रकार नाही, असा मतप्रवाह जोर धरत आहे. त्यामुळे मौखिक लोकवाङ्मयाचे महत्त्व वाढले आहे. युरोप-अमेरिकेतील अशा सिद्धान्तकल्पना भारतात जशाच्या तशा लागू पडत नाहीत. उचलेगिरीत आपलाच तोटा होतो. उदाहरणार्थ, प्रौढ शिक्षण योजनेचे यश वादविषय बनले आहे. प्रौढ शिक्षणात लोकवाङ्मयाचा वापर कसा उपयोगी ठरतो हे विलीचे स्वानुभवाचे विवेचन उद्बोधक वाटले. त्याच्या वसाहतवादी वारसा व भारतीय राष्ट्रीय कल्पनांवर मात्र वाद संभवतो.

अलीकडे स्त्रीवादी समीक्षेला बरे दिवस आले आहेत. मात्र लोकसाहित्यात स्त्रीमुक्तीची बीजे शोधल्याचे उदाहरण मला मराठीत आढळलेले नाही. (चूकभूल द्यावी घ्यावी.) विलीने मुलीला 'पदर' येण्यापासून गरोदरपणापर्यंतच्या विधींशी निगडित लोकगीते व लोककथांचा आढावा कोकणीच्या संदर्भात चांगला घेतला. गोव्याबाहेर

शिमोगा सारख्या कर्नाटकातील प्रदेशात लग्नसोहळ्यात अशी वरीच गीते प्रचलित आहेत. त्यातून स्त्री-पुरुष श्रेणीवद्धताच स्पष्ट होते. नवरी मुलगी वराच्या डाव्या हातालाच बसते, वगैरे. या विवेचनात महाराष्ट्रातील ग्रामीण भागात विवाहसोहळ्यात गायिल्या जाणाऱ्या गीतांशी बरेच साम्य मला आढळले. अर्थात या लोकगीतांचे सैद्धांतिक विवेचन मराठीत अजून झालेले नाही. लग्नातील उखाणे, आने, शिव्या, टोमणे, म्हणी वगैरे लोकसाहित्यप्रकार अजून उपेक्षितच आहेत.

विलीने स्त्रीमुक्तीच्या शक्यता सूचित करणारी एक लोककथा सविस्तर सांगितली. ती थोडक्यात अशीः तीन बहिणी. दोघी विवाहित. त्या माहेरी आल्यावर सासरच्या जाचाबद्दल बोलतात. तेव्हा तिसरी अविवाहित बहीण नवऱ्याला मुठीत ठेवण्याचा ताठा बोलून दाखवते. एक राजपुत्र ते ऐकून तिच्याशीच लग्न करतो. विवाह सोहळा उरकून लगेच लढाईवर निघताना तो तिला कोड्यात टाकतो, 'घर सांभाळ, मला वंशवृद्धीसाठी तुझ्यापासून मूल हवे. त्यासाठी तू लग्न कर.' या परीक्षेला उतरण्यासाठी ती पुरुष वेष करते. वधूच्या शोधात निघते. एका गावात वर परीक्षेची अट असते. गुलाबाच्या कळ्या त्या गावात स्त्री प्रवेश करताच उमलतात; पुरुष आला तर कोमेजतात. नायिका एका पोपटाला सगळ्या कळ्या खुडायला लावते. एका मुलीशी लग्न करून त्या 'पत्नीला' राज्य सांभाळायला ठेवते. स्वतः युद्धभूमीवर जाते. परिचारिका बनून जखमी नवऱ्याची सेवा करते. या सेवेची बक्षिशी म्हणून नवऱ्याची अंगठी व समागमाची मागणी करते. पुढे नवरा परततो तेव्हा पत्नीने व्यभिचार केल्याचा संशय घेतो. अंगठीमुळे उलगडा होतो आणि शेवट गोड होतो.

कालिदासाच्या शाकुंतलापासून शेक्सपिअरच्या **द मर्चंट ऑफ व्हेनिस** पर्यंत हा अंगठीचा घोळ चालत आल्याचे मी लक्षात आणून दिले. हान्डूंनी मात्र या लोककथेत पुरुषप्रधान संस्कृतीचेच प्राबल्य असल्याचे प्रतिपादन ठासून केले. लग्नाच्या मांडवात आमच्या गावच्या सुताराच्या पोरीला वराच्या हाताची दोन बोटे तुटल्याचे लक्षात आले. तिने तो सोहळा उधळून लावला. या बंडखोर मुलीची आधुनिक लोककथा सांगण्याची संधी मला मिळाली नाही. शहरापेक्षा अडाण्यांच्या खेड्यात स्त्रीमुक्ती अधिक प्रमाणात आढळते की काय हा संशोधनाचा वेगळा विषय आहे. दिसते तसे नसते, हे या कृतिसत्राचे महत्त्वाचे फलित पदरी पडले.

तीन तज्ज्ञांच्या व्याख्यानानंतर प्रात्यक्षिकासाठी खास वेळ राखून ठेवला होता. परंतु परिस्थितीजन्य अडचणीमुळे ती पार पाडता आली नाहीत, याची खंत सर्वांनाच लागून राहिली. मात्र त्या वेळात लोकसाहित्य संग्राहकांना उपयोगी पडतील असे अनुभवकथन मार्गदर्शकांनी केले. त्यामुळेच लोककलांच्या व्यापारीकरणातील धोके लक्षात आले. जुन्या लोकवाङ्मयाचे रक्षण करण्यातील धोके उमगू लागले. त्याचबरोबर विज्ञानयुगात लोकवाङ्मय कसे रूप पालटत आहे याची उद्‌बोधक उदाहरणे हान्डूंनी दिल्यामुळे दिलासा

मिळाला. लोकसाहित्याची नवी परिमाणे या कृतिसत्राने उमगली. शेवटी समारोप गोवा कला अकादमीचे पदाधिकारी व लोकसरिताचे लेखक विनायक खेडेकर यांच्या अध्यक्षतेखाली झाला. त्यांनी स्वानुभव कथनाने बहार आणली. सुंदर प्रमाणपत्रे पदरी पडली. शेवटच्या दिवशी मडगावजवळच्या कोलवा समुद्रकिनाऱ्यावर सहल आयोजित केली होती. हान्डू व बाजवांच्या बरोबर चार तास समुद्रस्नान घडले. लोकरंग मात्र समुद्रस्नानाने पुसले गेले नाहीत. मराठी लोकसाहित्याच्या सद्यस्थितीच्या संदर्भात उठलेले वैचारिक वादळ मात्र अजून डोक्यात घोंघावत आहे.

(इंग्रजी विभाग, गोवा विद्यापीठ, ४०३ २०३.)





अनुक्रमणिका






**डॉ. मेधा सिधये**

# संगीत मराठी रंगभूमीचे सांगोपांग विवेचन

आजच्या तरुण पिढीला पारंपरिक मराठी संगीत नाटकाची, नाट्यसंगीताची अभिरुची का नसावी हा चिंतेचा आणि चिंतनाचाही विषय आहे. ही अभिरुची नाही याच्या अनेक कारणांपैकी एक महत्त्वाचे कारण म्हणजे मराठी संगीत रंगभूमी हा आपला वैभवसंपन्न वारसा आहे असे वारंवार अभिमानाने बोलले, लिहिले जाते, पण त्याचा साक्षात प्रत्यय आज फार कमी प्रमाणात येतो. शिवाय भूतकाळाच्या गुहेत शिरण्याऐवजी, भविष्यकाळाची स्वप्ने रंगविण्याऐवजी, वर्तमानकाळ जगणे हे आजच्या तरुण पिढीच्या जीवनातले महत्त्वाचे सूत्र झाले आहे. आज आणि आत्ताच्या या जमान्यात अण्णासाहेब किर्लोस्करांनी एकशेतेरा वर्षांपूर्वी लावलेल्या केशराच्या शेताचा घमघमाट नाकापर्यंत पोहोचायचा कसा ?

अशा परिस्थितीत जुन्याचे वैचारिक पातळीवर मूल्यमापन करणे आणि परंपरेला नव्या युगधर्मानुसार नवे रूप देण्याचा प्रयत्न कोणी कोणी आणि कसा केला याचा विस्तृत आढावा घेणे ही काळाची गरज होती. जुनी संगीत रंगभूमी मृत झाली आहे अशी हाकाटी चालू असताना, सुजाण, चिंतनशील, व्यासंगी विद्वानांनी आणि जागरूक नाट्यसंस्थांनी काय केले पाहिजे, या प्रश्नाचे उत्तर म्हणजे पी. डी. ए. या संस्थेने, डॉ. श्रीरंग संगोराम यांच्या संपादकत्वाखाली केलेली 'वेध : संगीत नाटक आणि नाट्यसंगीत' या ग्रंथाची निर्मिती. साठोत्तरी मराठी संगीत रंगभूमीच्या संदर्भातील विविध पैलूंचा संबंधित अधिकारी व्यक्तींनी अभ्यास मांडणे आणि संगीत नाटकांसंबंधी, बदलत्या काळानुसार सांगोपांग विचार करून, पी. डी. ए. सारख्या संस्थेने, प्रयोग स्वरूपात खेळ मांडण्याचा संकल्प सोडणे या दोन्ही गोष्टी रसिकमनांना सुखविणाऱ्या आहेत. पी. डी. ए. ने ग्रंथनिर्मितीचे उद्दिष्ट पूर्ण केले आहे. आता नाट्यप्रयोगाशी संबंधित हालचालींना वेग येवो म्हणजे ग्रंथरूपाने मौलिक तात्त्विक चर्चा-चिंतन आणि प्रयोगरूपाने साक्षात अनुभूती असे हे वर्तुळ पूर्ण होईल. ग्रंथनिर्मिती ही बौद्धिक पातळीवर विश्लेषण करू इच्छिणाऱ्यांसाठी तर प्रयोगनिर्मिती अभ्यासकांबरोबरच बहुजनांचे समाराधन करण्यासाठी. म्हणून पी. डी. ए. चे हे दोन्ही संकल्प संस्थेच्या नावलौकिकाला साजेसेच आहेत.

या ग्रंथाला प्रा. वसंत कानेटकर यांनी प्रस्तावना लिहिलेली आहे. आपल्या तोनच



अनुक्रमणिका

पृष्ठांच्या छोटेखानी प्रस्तावनेत त्यांनी नाटकातील संगीताच्या मूळ स्वरूपाकडे नेमके लक्ष वेधले आहे. 'सौभद्र'पासून मराठी रंगभूमीवर सुवर्णयुग अवतरले हे नमूद करून ते म्हणतात, 'शास्त्रीय संगीताला वाट पुसत मराठी रंगभूमीवर नाट्यसंगीताची जी एक प्रतिमा फुलत गेली तिला जागतिक रंगभूमीच्या इतिहासात दुसरी तोड नाही.' हे विधान आपल्यापुरते ठीक आहे. अभिमान वाटायला लावणारे आहे, पण जागतिक रंगभूमीच्या पौर्वात्य व पाश्चात्त्य अभ्यासकांनी मराठी संगीत रंगभूमीविषयीचे तुलनात्मक विवेचन, मूल्यमापन कुठे, कधी, कसे केले आहे, किंबहुना ते विस्ताराने केले गेले आहे किंवा नाही, हेही वाचकांपुढे येणे आवश्यक आहे. मराठी संस्कृती हाडीमासी खिळलेल्या, मराठी भूमीशी घट्ट नातेसंबंध असलेल्या खऱ्याखुऱ्या मराठी मनांना हे नाट्यसंगीत डोलायला लावते, पण जागतिक स्तरावर ते किती परिणामकारक ठरते हे अजमावले गेले आहे का ? असा प्रश्न उपस्थित करावासा वाटतो तो एवढ्यासाठी की प्रत्येक गोष्टीचे स्थान जगाच्या नकाशावर तोलण्यात नकळत आपणच आपल्यावर अन्याय तर करीत नाही ना, याचा विचार व्हावा. जे 'आपले'- खास आपल्या भूमीतील सांस्कृतिक संदर्भ असलेले, ते समजा जर जागतिक स्तरावर मान्यता पावले नाही, तर ती मर्यादा किंवा उणीव मानायची का ? मला तसे वाटत नाही. उदाहरणार्थ 'प्रभु अजि गमला' किंवा 'चंद्र चवथिचा' जागतिक स्तरावर भावेल का ? 'कशी या त्यजू पदाला' म्हणणारी सिंधू एका विशिष्ट कालखंडातली, या मातीतली स्त्री आहे. तिच्या जगण्याचा आशय व दिशा 'पूर्वेची' आहे मग 'पश्चिमे'ला ती आकर्षित करून घेऊ शकेल का ? आपले संगीत नाटक किंवा नाट्यगीते जागतिक स्तरावर मान्यता पावली नाहीत तर ती मर्यादा आहे असे मानण्याचे कारण नाही. जागतिक रंगभूमीच्या पटावर आपली 'खासियत' तोलायचीच कशाला ? प्रा. कानेटकरांचे विधान आणि या ग्रंथात आलेली अशा प्रकारची विधाने आलंकारिक अर्थानेच घ्यावी लागतात.

रंगभूमीवरील संगीताच्या अतिरेकाचे ढोबळ उदाहरण म्हणून 'संशयकल्लोळ'मधील जलशाच्या प्रवेशाचा उल्लेख प्रा. कानेटकर यांनी केला आहे. एका टोकाला हा प्रवेश आणि दुसऱ्या टोकाला गद्य रंगभूमी यांच्यामध्ये कुठेतरी संगीत रंगभूमीचे स्थान आहे असे मत त्यांनी व्यक्त केले आहे. श्री. विद्याधर गोखले या ग्रंथातील आपल्या 'आमची संगीत रंगभूमी : चिंतन आणि चिंता' या लेखात, नाटकात गाणे सहजगत्या आले पाहिजे हे स्पष्ट करतात, ते 'संशयकल्लोळ' मधील पहिल्या अंकातल्या दुसऱ्या प्रवेशाच्या व तिसऱ्या अंकातील तिसऱ्या प्रवेशाच्या उदाहरणाने. पण जलशाच्या प्रवेशाबद्दल ते काहीच मत व्यक्त करीत नाहीत. 'दुधावर साय जशी आपोआप जमा होते, तद्वत् खऱ्या संगीत नाटकात, गाणी, संवादरूपी दुधावर आपोआप 'जमल्या'गत वाटली पाहिजेत' हे श्री. विद्याधर गोखले यांचे मत आणि 'जमीन खणताना झरा उसळावा तसे नाटकातील गद्य संवादातून नाट्यगीत उसळून फुटले पाहिजे' हे प्रा. कानेटकर यांचे मत, या दोन्हीतले समानसूत्र

'सहजता', 'नैसर्गिकता' हे आहे ही गोष्ट स्पष्ट आहे. नाट्यसंगीताच्या मूलभूत स्वरूपाबद्दल दोघांचेही एकमत आहे, पण जलशाचा प्रवेश फक्त प्रा. कानेटकर यांना खटकतो आणि श्री. विद्याधर गोखले त्यासंबंधी कोणताच उल्लेख करीत नाहीत. बहुचर्चात्मक विषय बाजूला ठेवावा अशी तर यामागील श्री. गोखले यांची भूमिका नसेल? तटस्थ मूल्यमापनाला मुरड घातली जाते ती अशी.

प्रा. कानेटकर यांनी आपल्या प्रास्ताविकात आणखी एक विचार मांडला आहे तो असा की, रंगभूमीवरील नाट्यप्रयोग आणि संगीत या दोन स्वतंत्र कला आहेत. त्या जोडीला चित्र, नृत्य, शिल्पादी स्वतंत्र कलांचाही परस्परांशी काही विशेष प्रकारचा संबंध या विविध कलांच्या आविष्कारात येत असतो. या विशेष प्रकारच्या संबंधाच्या नेमक्या सीमारेषा कोणत्या आणि त्यांची बलस्थाने आणि मर्यादा कोणत्या याचे सुस्पष्ट असे निकष वा मानदंड अजून निर्माण झालेले नाहीत. ते होणे अत्यंत जरुरीचे आहे. प्रा. कानेटकर यांचा हा विचार महत्त्वाचा आहे.

नाटकाचा संगीताशी जितका निकटचा संबंध प्रस्थापित झाला तितका चित्र, नृत्य, शिल्प इ. कलांचा नाटकाशी आणि परस्परांशीही झालेला नाही. नाट्य, नृत्य, संगीत या कलांना गती आहे. चित्र, शिल्प या स्थिर स्वरूपाच्या कला आहेत. त्यांचे भावनिक आवाहनही वेगळ्या प्रकारचे आहे. हे आवाहन समूहाला नसून व्यक्तीला आहे. त्यामुळे कदाचित या विविध कलांच्या परस्परसंबंधांकडे पुरेसे लक्ष गेले नसावे पण ते जाणे आवश्यक आहे. याबाबत कोणाचे दुमत होण्याचे कारण नाही.

'नाटकातली पात्रे जेव्हा गातात तेव्हा अवघे नाटकच गात असते' हे प्रा. कानेटकर यांचे विधान हा त्यांच्या प्रास्ताविकाचा गाभा आहे. नाटकातील पदे आणि नाट्य या दोन्हींची गती परस्परपूरक, परस्परपोषक असली पाहिजे. नाट्य रोखून धरून संगीताचा मारा केला जाऊ नये असेच त्यांना सुचवावयाचे आहे. नाट्यसंगीताविषयी प्रा. कानेटकर यांनी व्यक्त केलेली मते मूलगामी स्वरूपाची असल्यामुळे त्यांचे महत्त्व निर्विवाद आहे.

आपल्या संपादकीयात डॉ. संगोराम यांनी १९६० नंतर रंगभूमीवर आलेल्या संगीत नाटकांसंबंधीची विस्तृत चर्चा हा या ग्रंथाचा विशेष म्हणून सांगितलेला आहे. साठोत्तरी संगीत नाटकांबद्दल अशा प्रकारची विस्तृत चर्चा यापूर्वी झालेली नाही, ती व्हावी हे या ग्रंथाचे उद्दिष्ट आहे.

मान्यवर रंगकर्मींनी मराठी नाटकांच्या संदर्भात विचार, विश्लेषण, संशोधन अनुभवकथन अशा अंगांनी हा ग्रंथ परिपूर्ण करण्याचा मनापासून प्रयत्न केलेला आहे लेखक, दिग्दर्शक, गायक, संगीतकार, समीक्षक, संस्थाचालक अशा विविध नात्यांनी संगीत रंगभूमीशी डोळस जवळीक असलेल्या व्यक्तींच्या लेखांनी, मुलाखतींनी हा ग्रंथराज सजलेला आहे.



अनुक्रमणिका

ग्रंथाच्या संपादकांनी अपार कष्ट घेऊन हा ग्रंथ आपल्या हाती दिला आहे. त्यांच्या व्यासंगाच्या जाणकारीच्या खुणा यात दोन प्रकारे दिसतात. त्यांनी लिहिलेले संपादकीय ही एक उत्कृष्ट जमेची बाजू तसेच प्रत्येक लेखाच्या लेखकाचा आणि लेखातील आशयाचा त्यांनी करून दिलेला मार्मिक अभ्यासपूर्ण परिचय ही दुसरी बाजू.

संपादकांनी आपल्या विवेचनात, संगीत रंगभूमीच्या संदर्भातील महत्त्वाच्या अशा एका उणिवेवर अचूक बोट ठेवले आहे. किंबहुना ही उणीव जाणवत होती म्हणूनच हा ग्रंथप्रपंच करावासा वाटलेला आहे. मराठी संगीत नाटकाचे वैचारिक पातळीवर फार क्वचित स्वागत झाले ही वस्तुस्थिती त्यांनी निदर्शनास आणून दिली आहे. याला अपवाद ठरतील अशा लेखनाची उदाहरणेही त्यांनी दिली आहेत. ती जमेस धरूनसुद्धा रंगभूमी आणि संगीत यांच्या नात्याचा कलादृष्ट्या नीटसा विचार झालेला नाही हे सत्य मान्य करावे लागते. लेख, ग्रंथ, व्याख्याने, परिसंवाद यांद्वारे रंगभूमी आणि संगीत यांचा अनुबंध वैचारिक पातळीवर चर्चिला गेला नाही, त्याची परिणती संगीत रंगभूमी अस्ताच्या वाटेला लागण्यात झाली, असे प्रतिपादन येथे केलेले आहे.

संगीत रंगभूमीवर पदे गाजविणारे नामवंत गायक नट, त्यांना मिळणारे वन्समोअर, गायकनटांना तालीम देणारे गायनशिक्षक, नाटकांचे भव्य नेपथ्य, शालू-शेल्यांचा दिमाख, अत्तराचा घमघमाट या सगळ्यांची रसभरित वर्णने आपण ऐकली, वाचली. पण मराठी संगीत रंगभूमीच्या प्राणप्रतिष्ठेचा नेमका अन्वयार्थ, १८८० ते १९२० या संगीत रंगभूमीच्या कालखंडाची वैशिष्ट्ये, या रंगभूमीवर झालेली स्थित्यंतरे, लोकाभिरुचीत होत गेलेला बदल, उत्तरोत्तर संगीत रंगभूमीला आलेली मरणोन्मुख अवस्था या सगळ्याचा वैचारिक-तात्त्विक दृष्टिकोनातून विचार केला गेला का? याचे उत्तर 'नाही' असेच द्यावे लागते. परखड, समतोल, वस्तुनिष्ठ 'विचार' थोडा झाला. 'रस' ग्रहण अधिक झाले. नांदीचे सूर आणि धूपाचा सुगंध कानामनात साठवून घेऊन संगीत रंगभूमीबद्दल उत्कटतेने, प्रेमाने खूप काही बोलले-लिहिले गेले. तेही महत्त्वाचे होते आणि आहे. पण कधीतरी भावनेकडून विचाराकडे वळावे लागते. 'भावा'बरोबर 'अ-भाव' ही जाणून घ्यावा लागतो. वस्तुनिष्ठ नजरेने संबंधित सर्व घटकांचे मूल्यमापन व्हावे लागते. तरच ज्याला आपण आपला वारसा म्हणतो त्यातले सत्त्व टिकविता येण्याची शक्यता असते. त्यातील कालबाह्य घटक वगळून नवीन वाटा शोधता येतात, रुळवता येतात. साठोत्तरी मराठी संगीत रंगभूमीच्या बाबतीत काय घडले आहे, काय घडायला हवे आहे याचा विस्तृत विचार ग्रंथरूपाने वाचकांच्या पुढे भरीव स्वरूपात प्रथमच येत आहे. यादृष्टीने या ग्रंथाचे ऋण खूप मोठे आहे..

बदलत्या सांस्कृतिक मूल्यांच्या गुदमरलेल्या वातावरणात जगण्यातले माधुर्य, भावनोत्कटतेतला गोडवा, अभिजात सूरतालांच्या लयकारीने धुंद होऊन जोपासणे कितपत शक्य होईल? 'आजच्या' समाजाला ते आवाहन करू शकेल का? समाजपुरुषाची

आजची मानसिकता कोणत्या प्रकारची आहे? याचा विचार १९६०-७० नंतर संगीत रंगभूमीवर ज्यांनी आपली नाटके आणली त्यांपैकी काहींनी केलेला दिसतो. नव्या सुरांच्या, लय-ताल- नृत्याच्या माध्यमातून नवा आशय पोहोचविण्याचा यशस्वी प्रयत्न 'घाशीराम कोतवाल' सारख्या नाटकाने केला. संगीत नाटकाची ही एक वेगळी पठडी म्हणून नक्कीच महत्त्वाची आहे. ही नवी वाट हे पारंपरिक संगीत रंगभूमीच्या आजच्या परिस्थितीला दिलेले एक उत्तर आहे. म्हणून संपादकांनी साठोत्तरी संगीत रंगभूमीचे विवेचन हा या ग्रंथाचा केंद्रबिंदू ठरवून घेतला आहे.

मंदारमाला संप्रदाय आणि घाशीराम संप्रदाय या साठोत्तरी मराठी संगीत नाटकांच्या दोन समांतर संप्रदायांचे विवेचन संपादकांनी केलेले आहे. मंदारमाला संप्रदायाला ते 'नवपारंपरिक संगीत नाटक' म्हणतात तर घाशीराम संप्रदायाला 'नाट्यांग संगीत नाटक' असे म्हणतात. नवपारंपरिक संगीत नाटकात एक मंदारमाला पठडी व दुसरी सुवर्णतुला पठडी या दोन उपशाखा मानून त्यांचे सूक्ष्म मर्मग्राही विवेचन केलेले आहे. मंदारमाला पठडीतील नाटके, नाट्यपदांचे प्रयोजन व उपयोजन याबाबतीत नवी वाट निर्माण करणारी आहेत असे मत मांडून मंदारमालेपासून पुढे नाट्यसंगीताचा विचार स्वाभाविकतेचे सूत्र महत्त्वाचे मानून कसा झाला त्याचे विवेचन केले आहे. 'नाट्यमन्वंतर', 'नाट्यनिकेतन' या संस्थांच्या नाटकांमधील संगीताविषयीची चर्चा करून पुढे मंदारमाला, मेघमल्हार, स्वरसम्राज्ञी, कट्यार काळजात घुसली या नाटकांमध्ये मैफिली गायकांची योजना, नाटकातली पात्रे म्हणून कशी केली गेली आणि त्यामुळे संगीत नाटकांचा विशिष्ट बाज कसा निर्माण झाला ते सांगितले आहे. अशा प्रकारची संगीत नाटके आणि नाट्यपदे याबद्दल काही प्रश्न विचारून पूर्वपक्ष मांडला आहे व उत्तरपक्षी काही प्रमाणात त्यांची उत्तरेही दिली आहेत परंतु ती उत्तरे त्रोटक आहेत. हे प्रश्न असे आहेत–

१) नाट्यसंगीताच्या संदर्भात जी स्वाभाविकता आली, या स्वाभाविकतेत एक लपलेली कृत्रिमताच नाही का?

२) आगेमागे संवादाचा संदर्भ नसताना उपरेपणाने येणारी ही पदे या किंवा त्या कोणत्याही नाटकात आली तरी चपखल बसू शकतील मग त्यांचा त्या नाटकाशी रक्तसंबंध कसा काय जुळणार?

३) ख्याल-ठुमरीच्या बंदिशी त्याच मूळच्या रूपात गायिल्या जाणे यात रंगमंचाच्या दृष्टीने आवाजफेक, शब्दमोडणी, स्वररचनाकृती यांना वाव कोठे राहिला?

४) पारंपरिक नाट्यगायनामध्ये स्वरातून भावाभिनय करण्यासाठी जी रंगमंचीय गानसंहिता पूर्वसूरींनी आचरिली त्याला काय स्थान राहिले?

५) तुम्हाला नाट्यगायन ऐकवायचे आहे, की नाटकाचा बहाणा करून 'कोरे' गायनच ऐकवायचे आणि स्वाभाविकतेला तडा न जाऊ देता संगीत आणि नाटक यांचा सांधा

बेमालूम जमवून दिल्याचे (खोटे !) समाधान मिळवायचे आहे ?

पहिल्या प्रश्नाच्या संदर्भात असे म्हणावेसे वाटते की, नाटक हा प्रकारच मुळात कृत्रिम आहे. तिथे बेमालूमपणे वास्तवाचा आभासच निर्माण करायचा असतो या अर्थाने तो कृत्रिम आहे. म्हणजे नाटक गद्य असो वा संगीत, तिथल्या स्वाभाविकतेला मर्यादा आहेतच. त्यामुळे स्वाभाविकतेत लपलेली कृत्रिमता ही नाटकाच्या संदर्भात अटळ आहे.

उपऱ्या नाट्यपदांचा, नाटकाशी रक्तसंबंध जुळणार नाही हे तर उघडच आहे. स्वाभाविकतेची प्रतिज्ञा करून निर्माण झालेल्या ज्या साठोत्तरी संगीत नाटकात अशी उपरी पदे आहेत तो तेवढ्यापुरता दोषच म्हटला पाहिजे. पण प्रत्येक वेळी अशी उपरी पदेच असतात असे म्हणता येणार नाही.

रंगमंचावर ख्यालठुमरीच्या बंदिशी मूळ स्वरूपात केव्हा गायिल्या जातात? नाटकातली पात्रेच जर गायक, गायकाचा शिष्य, गायकाचा प्रतिस्पर्धी अशा प्रकारची असतील तर ! मग त्या वेळी त्या पात्राने या बंदिशी मैफिलीच्या ढंगात, पण फार विस्तार न करता गाणे हे स्वाभाविक आणि त्या नाटकातील गरजेपोटी आलेलेच मानायला नको का ? तेथे 'नाट्य' किंचित थांबेल, गायनाला प्राधान्य राहील आणि म्हणूनच रंगमंचीय आविष्काराला फार स्थान उरणार नाही. संगीत नाटकांमध्ये बरेचदा अभिनयगुणात कमी असलेले नट-नटी चालवून घेतले जातात, त्यांच्या गाननैपुण्याला प्राधान्य दिले जाते ते त्यामुळेच नाही का? अर्थात गायन आणि अभिनय दोन्हीत निपुण असलेले नट-नटी मिळाले तर सोन्याहून पिवळे; परंतु नेत्रांना सुखावण्यापेक्षा, कानांची तृप्ती करणे हीच जर संगीत नाटकांची मूळ धारणा असते, तर गाताना रंगमंचीय आविष्काराला फारसे प्राधान्य न देणे ही आपोआपच घडणारी गोष्ट आहे. शिवाय नाटकातील पात्र गायक म्हणूनच तिथे तंबोरा जुळवीत असल्याने त्याच्या गायनापुरती ती एक छोटीशी मैफलच असते. गानवेडे श्रोते त्यावर खूषच असतात. तरीही नटाने गाताना 'नाट्या'ची बूज राखलीच पाहिजे.

स्वरातून भावाभिनय ही गोष्ट रंगमंचावर उभ्या राहणाऱ्या गायक नट-नटीला जमलीच पाहिजे. या संदर्भातील चुका दिग्दर्शक टाळू शकेल. प्रेक्षकांच्या अभिप्रायातूनही सुधारणा होऊ शकेल.

पाचवा प्रश्न मला थोडा अधिक धारदार वाटतो. प्रेक्षकांना नाटक पाहिल्याचा आनंद देणे, सुंदर नाट्यगीते ऐकविणे आणि नाट्य व संगीत यांचा मेळ साधणे या सगळ्या गोष्टींचा उत्तम संगम होण्यासाठी काही तडजोडी अपरिहार्यच आहेत. तो 'बहाणा' नव्हता व नाही. संगीत रंगभूमीची परंपरा राखण्याचा, तिच्यात चैतन्य आणण्याच्या प्रयत्नातला तो एक महत्त्वाचा टप्पा होता असेच म्हणावयास हवे. अशा नाटकात 'उभ्या मैफिली' नसून काही साक्षेप सांभाळला गेल्याचे शिफारसपत्र संपादकांनी दिलेलेच आहे. शिवाय या नवपारंपरिक नाटकात काही पदे पात्रांनी मनोभाव व्यक्त करण्याकरिताही म्हटलेली आहेत.



अनुक्रमणिका







त्याची उदाहरणेही त्यांनी दिलेली आहेत. मग या नाटकांवर नेमका आक्षेप काय आहे त्याचे अधिक विवेचन करावयास हवे होते.

सुवर्णतुला पठडीबद्दल लिहिताना श्री. विद्याधर गोखले यांना त्यांचे श्रेय दिलेले आहे ही गोष्ट चांगली आहे. पण येथेच जाणवते की संगीत नाटके लिहून ज्यांनी संगीत रंगभूमीच्या पुनरुज्जीवनाचे प्रयत्न केले. त्यांच्या गौरवाबरोबरच जुनी पारंपरिक संगीत नाटके गेली चाळीस वर्षे ज्यांनी रंगभूमीवर जिद्दीने केली त्या शिलेदार कुटुंबीयांच्या कर्तबगारीचा व ऋणाचा उल्लेख संपादकीयात यायलाच हवा होता. संगीत रंगभूमीवरील त्यांच्या प्रयोगशीलतेबद्दल, गायनशैली किंवा अभिनयशैलीबद्दल काही मतभेद असू शकतील. परंतु संगीत रंगभूमी जिवंत ठेवण्याचे मोलाचे कार्य त्या कुटुंबाने केलेले आहे याची नोंद संपादकीयात व्हावयास हवी होती.

संपादकांनी, काळाचा परिणाम या दृष्टीने नवपारंपरिक नाटकांची कोणती वैशिष्ट्ये आढळतात यासंबंधी चर्चा केलेली आहे. पारंपरिक संगीत नाटकांच्या पंक्तीत, आधुनिक लेखकात संविधानक, व्यक्तिरेखा, पात्रयोजना, पद्यरचना व संगीतयोजना आणि एकंदरीने नाटक या घटकाच्या अनुशासनाची बूज राखणारी नाटके म्हणून तीन नाटकांचा उल्लेख केला आहे. ती तीन नाटके म्हणजे ब्रह्मकुमारी (विश्राम बेडेकर १९३३), मत्स्यगंधा (वसंत कानेटकर १९६४) आणि ययाती आणि देवयानी (वि. वा. शिरवाडकर १९६६).

संगीत रंगभूमीवरील चित्रपटांचा प्रभाव आणि भक्तिरसात्मक नाटके यांचा परामर्ष घेतलेला आहे.

नाट्यांग संगीत संप्रदायात लेकुरे उदंड जाली (१९६६), घाशीराम कोतवाल (१९७२), तीन पैशांचा तमाशा (१९८०), बेगम बर्वे, पडघम (१९८२) या नाटकांचा समावेश केलेला आहे. त्यांच्या संदर्भात, पारंपरिक व नवपारंपरिक नाटकांमध्ये संगीत हे नाट्यधर्मी बनून आले तर या नूतन नाटकांतून नाटक हे संगीतधर्मी बनून आले आहे असा अभिप्राय डॉ. संगोराम यांनी व्यक्त केला आहे. पारंपरिक नाट्यसंगीत आणि या नूतन नाटकांमधील संगीत यात जो मूलभूत फरक आहे तो त्यांनी नेमकेपणाने दाखवून दिला आहे. विषय, अभिव्यक्ती, प्रयोजन आणि परिणाम या सर्वच बाबतीत मूलभूत फरक आहे म्हणूनच चाकोरीबद्ध नाट्यसंगीतसमीक्षेत या नव्या संगीताला मज्जाव आहे हे निरीक्षण आणि विवेचन अतिशय महत्त्वाचे आणि सत्याचा स्पष्टपणे निर्देश करणारे आहे.

संगीत आणि नाटक यांच्या अनुबंधावर लक्ष केंद्रित करून संशोधन झालेले नाही हा संपादकीयातील प्रमुख मध्यवर्ती विचार मान्य करावा लागेल. पण याचे कारण संपादक म्हणतात त्याप्रमाणे समीक्षकांचे 'आलस्यप्रेरित अज्ञान' एव्हढेच असेल का? १८८० ते १९२० या संगीत रंगभूमीच्या सुवर्णयुगाच्या काळातच 'केसरी', 'विविध ज्ञानविस्तार', 'ज्ञानप्रकाश' इ. मध्ये नाटकांची समीक्षा येत होती. 'रंगभूमी' नियतकालिकात

संहितासमीक्षा व प्रयोगसमीक्षा खूप आलेली आहे. पण संगीत नाटकांवर यात लेख नाहीत. हा काळ कोल्हटकर, खाडिलकर, गडकरी यांचा आहे. कोल्हटकर संगीताचे मर्मज्ञ होते. संगीत नाटकांचे निर्माते होते. पदांना नवनवीन चाली देऊन त्यांनी नाट्यसंगीत क्षेत्रात आपला ठसा उमटविला. गडकऱ्यांच्या नाटकासाठी वि. सी. गुर्जर पदे लिहीत होते. खाडीलकरांनाही संगीताचे ज्ञान होते. या जाणकारांना संपादकांनी का लिहिते केले नाही ? कोल्हटकर तर नाट्यलेखक होते तसे नाट्यसमीक्षकही होते; मग तत्कालीन वृत्तपत्रे, नियतकालिके यांच्या संपादकांची काही जबाबदारी नव्हती का? 'रंगभूमी' नियतकालिकातही कोल्हटकर यांचे लेखन अत्यल्प आहे. संगीत रंगभूमीला २५-३० वर्षे झाल्यानंतर संगीत नाटकांची उत्तम प्रयोग समीक्षा लिहिणे, लिहवून घेणे का शक्य झाले नसावे ? वैयक्तिक हेवेदावे, पूर्वग्रह, अहंकार, स्पर्धा यांचे हे परिणाम आहेत. महाराष्ट्राला सर्वच क्षेत्रांत असलेला शाप नाट्यसृष्टीलाही बाधलेला आहे. १९३० च्या सुमारास मराठी रंगभूमीला मृतावस्था आली याचे प्रमुख कारण नाटकमंडळ्यांमध्ये फाटाफूट होऊन त्या बंद पडल्या हे आहे. इतर कारणेही आहेत. पण नाट्यकलेची अवनती करणारे, ती पाहणारे नाट्यकलेचेच सेवक होते ही वस्तुस्थिती नाकारता येणार नाही.

आजही युगानुकूल संगीत नाटक निर्माण होण्यात ज्या अडचणी आहेत त्या संपादकांनी स्पष्टपणे नोंदवावयास हव्या होत्या. आज उत्तम दर्जाचे संगीत नाटक का निर्माण होऊ शकत नाही याची कारणमीमांसा होणे अगत्याचे होते. उत्कृष्ट संगीत नाटक लिहू शकणाऱ्या नाटककाराची उणीव, निर्मात्यांचा धंदेवाईक दृष्टिकोन, प्रेक्षकांच्या अभिरुचीला वळण लावू शकणारा लेखक-दिग्दर्शक नसणे ही कारणे उघड आहेत. अव्यावसायिक संस्थांना संगीत रंगभूमी जगवण्यात रस नाही. नाट्यपरिषदेसारखी महत्त्वाची, मध्यवर्ती संस्था याबाबतीत उदासीन आहे. अभिनययुक्त गायनासाठी जबरदस्त मेहनत करण्याची तयारी असलेल्या नट-नट्यांची संख्या कमी आहे. ही सगळी वस्तुस्थिती संपादकांनी मांडली असती तर ते वस्तुस्थितीचे परखड वर्णन झाले असते. इतक्या महत्त्वपूर्ण ग्रंथात असे स्पष्ट प्रतिपादन आवश्यक ठरते.

अशा काही गोष्टी जाणवल्या तरी प्रस्तुत ग्रंथाचे संपादकीय गौरवास्पद आहे असेच म्हटले पाहिजे. अलीकडील संपादकीय ग्रंथांमध्ये इतके अभ्यासपूर्ण संपादकीय क्वचितच वाचावयास मिळते असे म्हटल्यास वावगे ठरू नये.

या ग्रंथामध्ये एकूण पंचेचाळीस लेख आहेत. काही लेख मुलाखतीच्या स्वरूपात आहेत. या लेखांचे स्थूलमानाने वर्गीकरण करून दाखविले तर ग्रंथाच्या अंतरंगाची नीट कल्पना येईल आणि हा एक महत्त्वाचा संदर्भग्रंथ असल्यामुळे, ज्या वाचकाला जो संदर्भ हवा असेल त्यानुसार त्या गटातील लेख एकत्र वाचता येतील. मराठी संगीत नाटक या विषयाच्या संदर्भातील अनेक पैलू या लेखांतून आलेले असल्याने विभागशः वाचन केले



अनुक्रमणिका

तर ते अधिक सोयीचे होईल असे वाटते. कारण ग्रंथाचा आवाका खूप मोठा आहे. अभ्यासाच्या,वाचनाच्या सोयीसाठी या ग्रंथातील लेखांचे वर्गीकरण–

**१) मराठी संगीत नाटकाचे स्वरूप वर्णन करणारे लेख–**

हे लेख पुढील लेखकांचे आहेत-

१.वसंत शांताराम देसाई,२.वि.वा.शिरवाडकर,३.सीताकांत लाड,४.मा.कृष्णराव, ५.डॉ.व.दि.कुलकर्णी,६.कमल अभ्यंकर,७.दिग्विजय वैद्य,८.डॉ.प्रभा अत्रे.

**२) मराठी संगीत नाटकाची वाटचाल, स्थित्यंतरे यांचा आलेख काढणारे लेख–**

१. माधव मनोहर, २. वि. रा. आठवले, ३. जितेन्द्र अभिषेकी, ४. आनंद मोडक, ५. श्यामला वनारसे.

**३) श्रेष्ठ गायकांवरील किंवा त्यांच्या गायनशैलीवरील लेख–**

१.वा.य.गाडगीळ (केशवराव भोसले)
२.चारुशीला दिवेकर (गोविंदराव टेंबे)
३.सुधीर दातार (पं.भास्करबुवा बखले)
४.योगिनी जोगळेकर (मा.कृष्णराव आणि परंपरा)
५.मधुसूदन विनायक पटवर्धन (विनायकबुवा पटवर्धन)
६.प्रभाकर जठार (मा.दीनानाथ)
७.मधुसूदन कानेटकर (भास्करबुवा बखले)
८.दीपा कार्लेकर (बालगंधर्व)

**४) विशिष्ट नाट्यसंस्थांच्या संदर्भात मराठी संगीत नाटकाचा विचार–**

१.गणपतराव मोहिते – बलवंत ते नाट्यनिकेतन
२.भालचंद्र पेंढारकर – ललितकलादर्श
३.मो.ग.रांगणेकर – नाट्यनिकेतन
४.छोटा गंधर्व – बालमोहन आणि नंतर
५.कीर्ती शिलेदार-तडवळकर – मराठी रंगभूमी.

**५) विशिष्ट नाटक, नाटककार, संगीतकार यांच्या संदर्भातील लेख–**

१.मु.श्री.कानडे – श्रीपाद कृष्णांची नाट्यपदे व संगीत.
२.म.वि.गोखले – विद्याधर गोखले यांची संगीत नाटके.

३. पुरुषोत्तम दारव्हेकर – संगीत नाटक आणि कट्यार
४. विजय तेंडुलकर – संगीत नाटक आणि घाशीराम
५. श्रीरंग संगोराम – बेगम बर्वेचे संगीत : एक टिपण
६. प्रदीप फाटक – मीरा मधुराचे नवे संगीत
७. स्वामी धर्मव्रत – पं. अभिषेकींचे नवयुगीन नाट्यसंगीत

६) **स्मरण. . .स्वानुभव. . .संकल्पना शोध. . .निरीक्षणे**

१. सुलभा ठकार – नाट्यसंगीत आणि समांतर संगीतप्रकार
२. ज्योत्स्ना भोळे – संगीत रंगभूमीवरील माझे संस्मरणीय
३. यशवंत देव – साठोत्तर संगीत नाटकातील स्वानुभव
४. वि. भा. देशपांडे – रंगभूमी आणि संगीत : काही निरीक्षणे
५. भास्कर चंदावरकर – नाट्यसंगीतातील माझे प्रयोग

७) **अवांतर**

१. अशोक रानडे – संगीत नाटक :सांस्कृतिक संदर्भ
२. विद्याधर गोखले – आमची मराठी रंगभूमी :चिंतन आणि चिंता
३. अरविंद वामन कुलकर्णी – मराठी नाटकातील पदरचनेविषयी
४. राजीव परांजपे – संगीत नाटकाची साथसंगत
५. शैला दातार – नांदी आणि भरतवाक्य
६. अनंत तोरो – कन्नड संगीत रंगभूमी (विसावे शतक)
७. शशिकांत कुलकर्णी – संगीत नाटकसेवी संस्थांचे परिशिष्ट

या ग्रंथात प्रभा अत्रे, भालचंद्र पेंढारकर, ज्योत्स्ना भोळे, छोटा गंधर्व, अशोक रानडे, विजय तेंडुलकर यांच्या मुलाखती अनुक्रमे संजीव शेंडे, श्रीकृष्ण दळवी, वंदना खांडेकर, शैला दातार, श्यामला वनारसे, चन्द्रशेखर बर्वे यांनी घेतलेल्या आहेत. त्यातून महत्त्वाचे विचार वाचावयास मिळतात.

वसंत शांताराम देसाई यांच्या मते, जुन्या काळात, संगीत नाटकात सात-सात आठ-आठ वन्समोअर घेतले जात होते, एकेक पद अर्धा अर्धा तास आळवले जात होते या दंतकथा आहेत.

आपल्या लेखात किर्लोस्करी संगीत नाटक अंतर्धान पावण्याचीच शक्यता त्यांनी व्यक्त केली आहे. डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी सं. सौभद्रला केंद्रस्थानी ठेवून मराठी संगीत नाटकाचे मूळ नाट्यस्वरूप तपासलेले आहे. डॉ. व. दि. कुलकर्णी आणि डॉ. कमल अभ्यंकर यांनी किर्लोस्करांच्या शाकुंतलसंबंधी केलेले विवेचन परस्परांना काहीसे छेद देणारे आहे.

डॉ. प्रभा अत्रे यांनी नाट्यसंगीत मैफिलीत अवाधित राहील असा निर्वाळा दिला आहे तर विद्याधर गोखले यांनी मैफिलीतल्या नाट्यसंगीताला विरोध दर्शविला आहे. नाट्यसंगीताला नाट्याभिमुख मार्गानेच जावे लागेल, असे मत आनंद मोडक यांनी व्यक्त केले आहे.

जुन्या पिढीतील गायकनटांवर या ग्रंथात जसे लेख आहेत तसेच पुढील काळातील नटांच्या गायकीविषयीही लिहिले जाणे आवश्यक होते. जुन्या गायक नटांइतकी कीर्ती, लोकप्रियता त्यांना नसली तरी रंगभूमीवरील संगीताची परंपरा त्यांनी टिकवून धरली हे अमान्य करता येणार नाही. शिलेदार कुटुंबीय, श्रीपादराव नेवरेकर, रामदास कामत, उदयराज गोडबोले, प्रकाश घांग्रेकर, नूतन पेंढारकर, भालचंद्र पेंढारकर, फैय्याझ, मधुवंती दांडेकर, क्षमा वैद्य अशा अनेक गायक-गायिकांनी नाट्यरसिकांना आनंद दिलेला आहे. त्यांच्या गायकीची वैशिष्ट्ये, गुण-दोष यांचे विवेचन आता व्हावयास हवे होते इतका काळ लोटलेला आहे.

नाट्यसंस्थांच्या संदर्भातील लेखात खूप नवे काही वाचावयास मिळेल अशी अपेक्षा वाचक करतील असे वाटत नाही. कारण यासंबंधीची माहिती अन्यत्रही वाचलेली असते. ती एकत्रितपणे येथे आली इतकेच म्हणता येईल. स्वामी धर्मव्रत, सुलभा ठकार, भास्कर चंदावरकर यांचे लेख त्या त्या विषयातील मर्म उलगडून दाखविणारे आहेत. कन्नड रंगभूमीचा मराठी रंगभूमशी घनिष्ट संबंध आहे. तसाच संगीताच्या बाबतीत पारशी रंगभूमीशी आहे. म्हणून पारशी रंगभूमीविषयीच्या लेखाचा अंतर्भाव असता तर ती महत्त्वपूर्ण बाब ठरली असती. अर्थात् या विषयाचा व्याप मुळातच इतका मोठा आहे की इच्छा असली तरी सर्वच गोष्टींचा समावेश करणे अवघड व्हावे. जवळजवळ प्रत्येक लेख महत्त्वाचा आहे, चिंतन, मनन, अनुभव यातून स्फुरलेला आहे हे या ग्रंथाचे वैशिष्ट्य आहे. १९९३ मध्ये एक उत्कृष्ट ग्रंथ वाचकांच्या हाती दिल्याबद्दल पी. डी. ए. या संस्थेचे आणि संपादक डॉ. श्रीरंग संगोराम यांचे, वाचक ऋणी राहतील.

(वेध : संगीत नाटक आणि नाट्यसंगीत : संपादक—डॉ. श्रीरंग संगोराम संपादनसहभाग : केशव रा. घुले, शशिकांत कुलकर्णी, निर्मिती व प्रकाशन- प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशन, पुणे ९. पृष्ठसंख्या ५४०. मूल्य १७५ रु./-)

(आधार अपार्टमेंटस्, ३०५ नारायण पेठ, पुणे ४११०३०.)

अनुक्रमणिका

द. धों. रत्नपारखी

# जपानचे अंतरंगदर्शन

जपानी भापा शिकण्याच्या आकर्पणामुळे व जपानभेटीच्या आंतरिक ओढीने श्री. कुमार साठे यांनी जपानी भाषा शिकून घेतली व इंडो-जपानी असोसिएशनच्या कामात रस घेण्यास सुरुवात केली. इंडो-जपानी असोसिएशनतर्फे वेळोवेळी भारतात आलेली जपानी माणसे त्यांच्या घरी राहून गेली. त्यांच्या आग्रहामुळे नंतर श्री. साठे सपत्निक जपानला गेले. तेथे जपानी कुटुंबात राहून व जपानमध्ये फिरून जपानच्या जीवनाची जी माहिती मिळवली ती त्यांनी 'फुजीसानचा सुंदर देश' या पुस्तकातून वाचकांपुढे सादर केली आहे. 'फुजीसानचा सुंदर देश' हे केवळ प्रवासवर्णनात्मक पुस्तक नाही, तर त्या देशाच्या भेटीत लेखकाला मिळालेल्या माहितीचा व आलेल्या अनुभवांचा एक सुंदर आलेख आहे.

जपानमधील वास्तव्यात श्री. साठे यांना तेथील वाहतूक व्यवस्था, कामगारांचे जग, शिक्षणव्यवस्था,जपानी माणसाची स्वभाववैशिष्ट्ये बघता आली. आपल्या देशातील भयानक रस्त्यांच्या विरोधाभासात जपानमधील रस्त्यात आढळलेली स्वच्छता व रस्त्यांची उत्तम स्थिती कौतुकास्पद वाटते. तेथील रस्ते, बस स्टँड, रेल्वे स्टेशन, घराचा परिसर अत्यंत स्वच्छ व टापटिपीचा असतो. स्वच्छता केवळ घरापुरती नाही तर घराभोवतीचा व आपल्या कॉलनीतील परिसर तेथील रहिवासी आळीपाळीने स्वतः स्वच्छ करतात. तेथील रेल्वेचा कारभार (जो बहुतांशी खासगी कंपन्यांतर्फे चालविला जातो) उत्कृष्ट आहे. त्यामुळे गेल्या २५-२६ वर्षांत एकही अपघात झालेला नाही हे त्यांनी नमूद केले आहे. प्लॅटफॉर्मवर रेल्वेगाडीचे डबे खुणा केलेल्या जागेवरच येत असल्याने व लोक रांगेत उभे राहून एका बाजूने चढतात व दुसऱ्या बाजूने उतरतात त्यामुळे स्टेशनवर धक्काबुक्की, गोंधळ, आरडाओरडा नसतो.

जपानमध्ये शिक्षण मातृभाषेत दिले जाते. पहिल्या नऊ वर्षांचे शिक्षण सक्तीचे आणि मोफत असते व त्याबाबत सरकार आपली जबाबदारी तत्परतेने पाळते. प्रवेशपरीक्षेत उत्तम ग्रेड मिळाल्याशिवाय कॉलेजात प्रवेश मिळत नाही. त्यामुळे शिक्षणाचा दर्जा चांगला राहतो. जपानी लोकांना संस्कृत व हिंदी भाषा शिकण्याची ओढ आहे. त्यासाठी एशिया-आफ्रिकी लिंग्विस्टिक इन्स्टिट्यूट टोकियोत कार्यरत आहे. जपानी लोकांना वाचनाची आवड असल्यामुळे प्रत्येकाच्या घरात १००-१५० पुस्तके तरी असतातच.

जपानी लोकांची नीतिमत्ताही वाखाणण्यासारखी आहे. तिकीट काढून रेल्वेत बसण्याइतका अवधी नसला तर जपानी माणूस तिकिटाशिवाय प्रवास करून उतरलेल्या

स्टेशनभर भाड्याचे पैसे तिकीटघरात दिल्याशिवाय जात नाही. रात्री-वेरात्री सुद्धा एकटादुकटा माणूस स्त्रिया व मुलीसुद्धा जपानमध्ये निर्भयपणे फिरू शकतात.

तेथील लोकांना व्यायामाची म्हणजे पळणे, जॉगिंग, पोहणे, स्केटिंग, गिर्यारोहण इत्यादींची खूप आवड आहे. त्यामुळे जपानमध्ये लठ्ठ, जाड, पोट सुटलेली माणसे क्वचितच दिसतात. तेथे स्त्री-पुरुष समानता आढळते. सर्व कामे स्त्रिया आणि पुरुष समजून करतात. जपानी स्त्रिया दागिने घालून मिरवताना दिसत नाहीत. फक्त सणासमारंभाला भारी किमोनो घालतात. जपानी माणसे सर्वसाधारणपणे अबोल व घुमी असतात. त्यांना बोलते केल्याशिवाय ते फारसे बोलत नाहीत. जपानी माणसे 'हाराकिरी' (आत्महत्या) करतात यावरून ती जरा हट्टी आणि दुराग्रही असावीत असे लेखकाचे मत दिसते.

जपानमधील घरे लाकडाची व साधी असतात. घरात फर्निचरचा पसारा व कपाटे, सोफासेट अशा अवजड वस्तू दिसत नाहीत. फक्त जेवणाचे टेवल, दोन-तीन खुर्च्या व चटया असतात. आपल्याकडे नातलग मित्रमंडळी हसूनखेळून गप्पा मारतात तसे खेळकर वातावरण जपानी घरात दिसत नाही. आपल्याकडील या खेळकर वातावरणाचे त्यांना फार कौतुक वाटते.

जपानी लोकांची सौंदर्यदृष्टी वाखाणण्यासारखी आहे. दाराखिडक्यांना आकर्षक पडदे, निरनिराळ्या सुंदर पुष्परचना हे त्यांचे वैशिष्ट्य आहे. त्यांच्या हातात कोणतीही वस्तू गेली की तिला एक सुबक व आकर्षक आकार येतो. थडगीही त्याला अपवाद नाहीत. सुंदर बांधलेली थडगी त्यावर कुटुंबाचे बोधचिन्ह व पुष्पगुच्छ ठेवून ती आकर्षक केली जातात.

जपानमध्ये आपल्याकडील चातुर्वर्ण्यपद्धतीप्रमाणे पंचवर्ण पद्धती (क्षत्रिय, शेतकरी, कारागीर, वैश्य, अस्पृश्य) पूर्वी प्रचलित होती. ही पद्धत सध्या नाही. तरीसुद्धा तेथे अस्पृश्यवर्ग (त्या वर्गाला बुराकोमिन म्हणतात) अजून थोड्या प्रमाणात आहे. ही वाईट प्रथा तरुण वर्गाला मान्य नाही. त्यामुळे जातीभेद, वर्णभेद, उच्चनीचपणा या समाजात फारसा दिसत नाही. जपानमध्ये धर्म आणि राजकारण यांची फारकत केलेली आहे. धर्मावर आधारित एकही सरकारी सुटी दिली जात नाही. पण तेथेही थोडीफार अंधश्रद्धा दिसून येते. आपल्याकडे पोपटाकडून भविष्य सांगितले जाते, तसे तेथे बाहुलीकडून सांगितले जाते. रस्त्यात चांगला आकार दिलेले दगड ठेवलेले असतात. त्याला 'दोसोजिम' (Travellers God) म्हणतात व प्रवास सुखकर व्हावा म्हणून त्या दगडाची प्रार्थना करतात.

जपानी माणसाची शिस्त, कार्यरतता आणि राष्ट्रप्रेम मात्र अपूर्व आहे. त्यांना वेळेचा अपव्यय मुळीच मान्य नाही. तेथे प्रत्येकजण वेळेवर कामाला येतो व नेमून दिलेले काम मन लावून करतो. कामावर असताना काम सोडून तो कोठेही जात नाही. कामाच्या वेळेत काम संपले नाही, तर उशिरा बसून काम पुरे केल्याशिवाय घरी जात नाही. तेथे ओव्हरटाईम अलाउन्स हा शब्दही माहीत नाही. वर्षातून फक्त १२ दिवस रजा व १२ सार्वजनिक सुट्ट्या असतात. धार्मिक, सामाजिक व राजकारणी माणसांच्या जयंत्या/पुण्यतिथ्या साजऱ्या केल्या

जात नाहीत. तेथे १२ दिवसांपेक्षा जास्त गैरहजर राहता येत नाही व तसे राहिल्यास नोकरीचा राजीनामा द्यावा लागतो. कामगार व व्यवस्थापन यांच्यात मतभेद झाल्यास कामगार संप करीत नाहीत, तर फक्त काळी फीत लावून काम करतात. जपानी माणसात स्वार्थासाठी कायदा धाब्यावर बसविण्याची वृत्ती दिसत नाही. म्हणूनच ७० टक्के डोंगराळ भाग व फक्त १५ टक्के शेतीयोग्य जमीन अशी प्रतिकूल परिस्थिती असूनही अविश्रांत मेहनत, सचोटी, शिस्त, अचूक नियोजन व राष्ट्रप्रेम या गुणांमुळे अत्यंत प्रगत आणि समृद्ध राष्ट्र म्हणून जपानने आज जगात नाव केलेले आहे. या पुस्तकांच्या वाचनाने जपानी माणसाच्या या गुणांचा अंगिकार करण्याची इच्छा भारतीयांच्या मनात निर्माण व्हावी, अशी अपेक्षा मात्र व्यक्त करावीशी वाटते.

जपानमधील राजकीय स्थिती, आर्थिक घडामोडी, साहित्य, संगीत इ. कलांचे वातावरण, सामाजिक चळवळी याबद्दलची माहिती व अनुभव या पुस्तकांत सांगितले गेले असते तर जपानचे दर्शन जास्त परिपूर्ण व रोचक झाले असते.

पुस्तकाचे बहिरंग व अंतर्गत सजावट सौंदर्यपूर्ण आहे.

(फुजिसानचा सुंदर देश; कुमार द्वा. साठे, व्हीनस प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे ७७, मूल्य-रु. ६०/-)
(विनायक स्मृती, ११४ अ, प्रभात रस्ता, पुणे ४.)

---

प्रा. सौ. सरदेसाई

# रशियन कथांचा समर्थ अनुवाद

सौ. सुहासिनी पाटील यांचे 'मर्युत्का' हे अनुवादित पुस्तक खूप कुतूहलाने वाचायला घेतले. कारण पुस्तकाच्या प्रस्तावनेत त्यांनीच म्हटल्याप्रमाणे पुस्तकातील कथांनी त्यांना २० वर्षे झपाटले होते. त्या कथांविषयी त्यांचे मत अतिशय हळुवार आणि संवेदनक्षम असल्याने मराठी रसिक वाचकांच्या हातात त्यांनी त्या कथा जरा भीतभीतच ठेवल्या आहेत. कथांच्या उत्कृष्टतेबद्दल त्यांना किंचितही शंका नाही. मराठी वाचक रसिक व जाणकार आहे ही गोष्ट निर्विवाद. सौ. पाटील ह्यांना शंका आहे ती एवढीच की मूळ कथांची उंची आपल्या भाषेच्या स्पर्शाने कोठे कमी तर होणार नाही ना ?

प्रथमच मी सुहासिनी पाटील ह्यांना असा दिलासा देते की अनुवादात आणि सादरीकरणात त्या कोठेही कमी पडलेल्या नाहीत. मला मूळ कथा खूपच आवडल्या आणि त्यांचा अनुवादही तितकाच आवडला. त्या कथांपर्यंत मी सुहासिनी पाटील यांच्या माध्यमातूनच तर पोचले. एक अनुवादित सुंदर कथासंग्रह त्यांच्यामुळे मराठी भाषेला मिळाला. त्यांचे मनापासून अभिनंदन.



अनुक्रमणिका

पुस्तकातील कथांचा अनुवाद सौ. पाटील यांनी स्वतः कोणत्या भाषेतून केला आहे हे कुतूहल पुस्तक वाचून शमत नाही. पण हा प्रश्न अनुत्तरित राहिला तरी कथांचा आस्वाद घेण्यात कोणतीही उणीव भासली नाही. श्री. पु. ल. देशपांडे यांनी अनुवादाची चेष्टा केव्हा होऊ शकते हे सांगताना असे म्हटले आहे की मोठ्या जत्रेच्या गर्दीत जशी मुले-माणसे हरवतात तशी वाक्यातील कर्ता-कर्म-क्रियापदे-विशेषणे-क्रियाविशेषणे रानोमाळ भटकून आपल्या जागा विसरली तर अनुवादाची घडी निश्चितच विस्कटते. सौ. पाटील यांच्या अनुवादात ही सगळी मंडळी आपापल्या जागा धरून पण दिमाखात बसली आहेत. भाषा प्रवाही आहे, तिला ओघ आहे, प्रसन्नता आहे. ती कृत्रिम नसल्याने सुलभपणे वाचक कथेच्या प्रवाहावरोबर पुढे जात राहतो.

ह्या पुस्तकातील कथांची जात पाहता त्या बहुसंख्य वाचकांना मनापासून आवडतील. पुस्तक वाचून वाचक कथांमधील कांही चरित्रांच्या हिमालयाएवढ्या उंचीने भारावून जातील आणि आपल्या आनंदात सहभागी करून घेण्यासाठी इतरांना त्याची शिफारस करतील. निखळ आनंद देणाऱ्या या कथांची 'बहुचर्चित', 'वादग्रस्त' किंवा 'वादळी' इत्यादी विशेषणांनी मात्र संभावना होणार नाही. तरीही कथा कुणाला आवडतील, कुणाला खूप आवडतील तर कुणाच्या लक्षात यातील चरित्ररेखा आयुष्यभर राहतील.

या कथांमधील घटनांचा काल आणि कथांचा लेखनकाल लक्षात घेतला तर असे जाणवेल की ज्या काळात सोव्हिएट लेखक क्रांतीच्या तत्वज्ञानाशी बांधिलकी ठेवून लेखन करीत होते, त्या काळातील ह्या कथा आहेत. ह्या तिन्ही कथा क्रांतीच्या विशिष्ट तत्वज्ञानावर निष्ठा असणाऱ्या लेखकाच्या. पण लेखक म्हणूनही श्री. बोरीस लाव्रेन्योवची मान्यताही निर्विवादच आहे. आकर्षक शैली, सूक्ष्म चित्रण, उच्चतम लेखन गुण, क्रान्ती-निष्ठा यांचे उत्तम सुंदर मिश्रण या कथांमध्ये आहे. सौ. पाटील यांनी प्रगती प्रकाशन, मॉस्कोने प्रकाशित केलेल्या 'इकतालिसवा' या हिंदी कथासंग्रहावरून या कथा अनुवादित केल्या आहेत. त्या करताना त्यांनी काही पाल्हाळिक वर्णने गाळून उत्तम सांधेजोड केलीय. पण त्यामुळे कुठेही रसहानी होत नाही.

निर्भयता, त्याग, बलिदान, उत्कट देशभक्ती हे गुण शतकानुशतके मानवी मनाला मोह घालीत आले आहेत. ह्या गुणसमुच्चयाचे आकर्षण सार्वदेशिक, व सार्वकालिक सत्य आहे.

ह्या कथांचा मनावर विलक्षण प्रभाव पडतो त्याचे एक कारण मर्युत्का, ओर्लोव सारख्या हिमालयाची उंची गाठणाऱ्या व्यक्तिरेखा. आणि ह्या व्यक्तिरेखा आपल्याला परक्या वाटत नाहीत. कारण सुहासिनी पाटील यांनी म्हटल्याप्रमाणे भगतसिंगासारखे अनेक क्रांतिकारक आपल्यालाही परिचित आहेत. दीपज्योतीवर झडप घालून पतंगाप्रमाणे आत्मबलिदान करणारे, देशासाठी आयुष्य झोकून देणारे 'ओर्लोव' आपल्यापासून दूर नाहीत.

जयशंकर प्रसादांच्या 'पुरस्कार' ह्या ऐतिहासिक कथेची नायिका मधुलिकाने

अनुक्रमणिका

[illegible] प्रियकराला प्राणदंडाची शिक्षा देवविली. पण आपल्या व्यक्तिगत प्रेमासाठी आपल्यालाही त्याच्याबरोबर प्राणदंड मिळावा अशी जगावेगळी मागणी केली, तर मर्युत्काने आपल्या शत्रू प्रियकराला स्वतःच प्राणदंड दिला. पण नंतर त्याच्यावरच्या प्रेमाच्या आठवणीने ती विलापही करते, तर मधुलिका स्वतः प्राणत्याग करायला निघाली. जाज्वल्य, प्रखर देशप्रेमही तसेच अन् वैयक्तिक प्रेमामुळे आलेली व्याकुळताही तशीच.

'मीत्या' कथेत मनुष्य-स्वभावाचे अनेक नमुने बघायला मिळतात. मनुष्य-स्वभावातील क्रौर्याचे भीषण दर्शन असह्य होऊन ओ हिड्डी प्रशांत महासागरात स्वतःला झोकून देतो. ओ हिड्डीप्रमाणे एकाच क्रूर घटनेने जरी नाही तरी आजूबाजूच्या समाजाची संवेदनशून्यता, बधिरता, स्वार्थी वृत्ती असह्य होऊन साने गुरुजींनाही आयुष्यच नकोसे झाले.

पुस्तकाचे मुखपृष्ठ देखणे आहे. उत्तम कागद आणि स्वच्छ छपाईमुळे बहिरंग देखणे झाले आहे. अशा पुस्तकात शुद्धलेखनाच्या काही चुका राहून गेल्या आहेत.

हा कथासंग्रह मूळ सोव्हिएट वाङ्मयातील अक्षर कथांचा संग्रह आहे. त्याचा सरस, प्रवाही भाषेत सहजसुंदर अनुवाद करणाऱ्या सौ. सुहासिनी पाटील अभिनंदनास पात्र आहेत. ह्या क्षेत्रात त्या सफलपणे वाटचाल करू शकतील. त्यात त्यांना निश्चितच गती आहे. रसिक मराठी वाचक या कथांचे आनंदाने स्वागत करतील. पण कथा दोन वेळा वाचल्या पाहिजेत. प्रथम वाचनात वाचक कथेच्या पार्श्वभूमीशी परिचित होतो तर दुसऱ्या वाचनात त्याला कथांची खरी सौंदर्यस्थळे, चारित्रिक उंची लक्षात येतात.

(मर्युत्का : मूळ लेखक-बोरीस लार्वेन्योव, अनुवाद-सौ. सुहासिनी पाटील, 'श्रेयस' १३४ जयहिंद कॉलनी, देवपूर, धुळे ५२५ ००२, पृष्ठे ७७, मूल्य ४० रुपये.)

(जयहिंद महाविद्यालय, वाडीभोकरा रस्ता, धुळे.)

---

**डॉ. मालती बर्वे (पांडे)**

# जयपूर आणि आग्रा घराण्यांच्या गायकीची वैशिष्ट्ये

मान्यवर गायक श्री. बबनराव हळदणकर यांच्या 'जुळू पाहणारे दोन तंबोरे' या पुस्तकाच्या शीर्षकातच त्याचे मर्म साठविलेले आहे असे म्हणता येईल. जुळू पाहणारे, पण जे पूर्णतया जुळलेले नाहीत असे हे दोन तंबोरे दोन घराण्यांचे प्रतिनिधी मानले तर त्यात सुसंवाद आणि विसंवाद कुठे आणि कसा आहे हे सांगण्याचा प्रामाणिक प्रयत्न प्रस्तुत पुस्तकात केला आहे. ज्या दोन घराण्यांचे (जयपूर आणि आग्रा) शिष्यत्व त्यांनी पत्करले त्या दोन घराण्यांच्या गायकीतील साम्य, भेद, त्यांची वैशिष्ट्ये यांचे सखोल, अनुभवपूर्ण मार्मिक












विवेचन अतिशय सुंदर भाषेत त्यांनी केले आहे. उत्कृष्ट गायक आणि उत्कृष्ट लेखक असे समीकरण सहसा आढळत नाही.

'घराणे' म्हणजे निव्वळ खानदान नसून संगीताविष्कारास बैठक प्राप्त झालेली आणि दीर्घ परंपरा लाभलेली 'गायकी' आणि घराणे' या शब्दाची व्याख्या ते करतात. अशा या दोन घराण्यांच्या गायकीचे निव्वळ मूल्यमापन न करता तीत दडलेली सौंदर्यमूल्ये व एखाद्या गायकीची प्रतिज्ञा अथवा शिस्त सौंदर्यनिर्मितीच्या कक्षा कशा सीमित करते याचा ऊहापोह या पुस्तकात केलेला आहे.

सर्व ललित कलांमध्ये संगीत ही अमूर्त कला आहे. या अमूर्तातील सौंदर्याचा वेध घेण्याचा प्रयत्न त्यांनी सर्वांगीण विकास पावलेल्या ख्याल गायकीच्या आधारे केला आहे. एखाद्या मैफिलीत राग भावाशी आणि बंदिशी बरोबर पूर्णतया एकरूप होऊन त्यातील सातत्य आणि सुसंगती कायम राखून केलेला उत्स्फूर्त आविष्कार दीर्घजीवी अशी एक विशाल संरचना निर्माण करीत असतो. याउलट योजनाबद्ध आविष्कार हा त्या तुलनेत निर्जीव आणि कृत्रिम भासतो. अशा उत्स्फूर्त आविष्कारातील सौंदर्यानिर्मितीचे घटक सांगून त्यांचे कार्य काय हे त्यांनी सांगितले आहे.

१) **भारदस्तपणा :** हा गुण गायकाचा स्तर उच्च ठेवण्यासाठी आवश्यक आहे. यासाठी आवाज वजनदार, धारदार, घुमारयुक्त कमावणे आणि रागप्रकृतीनुसार राग मांडणी, आस, मींड, गमक यांचा आवश्यक तिथे आणि आवश्यक तेव्हढाच उपयोग करणे आणि लांब पल्ल्याच्या सुरावटींचा गायनात उपयोग करणे.

**मोजकेपणा व प्रमाणबद्धता :** स्वरांचे अल्पत्व, बहुत्व लक्षात ठेवून रेखीव, सुबक, प्रमाणबद्ध केलेली सुरावट सौंदर्याविष्कारास मदत करते. मात्र या मोजकेपणासाठी तालावरील प्रभुत्वाची आवश्यकता आहे. या मोजकेपणाच्या आयोजनेत 'आमद' चा अंतर्भाव होतो असे ते म्हणतात. हा शब्द मला अपरिचित आहे. सांगीतिक आवर्तनभर घेतलेल्या सुरावटी आणि चीजेचा मुखडा यांतील दुवा म्हणजे 'आमद' होय. हे सर्व पैलू संभाळून केलेली ढंगदार पेशकारी अमूर्ताकडे नेणारी असते.

यानंतर जयपूर-अत्रोली घराण्याची ओळख ते करून देतात. या घराण्याचे जनक म. अल्लादियाखाँ होत. ते मूळचे ध्रुपदिये. पण या गायकीची काटेकोर बंधने झुगारून देऊन अमूर्त, मुक्त आविष्कार असलेली ख्याल गायनाची आपली स्वतंत्र शैली त्यांनी बनवली. त्यांच्या गायकीचे वर्णन कै. डॉ. ना. र. मारुलकर व कै. वामनराव देशपांडे यांनी आपापल्या पुस्तकांतून यथोचित केले आहे. त्यावरून अतिशय भारदस्त, लयीच्या अंगाने जाणारी, 'गमके' वर आधारित अशी अतूट स्थायी भरण्याची पद्धत आणि मुबारक अली खाँ पासून उचललेली तानेची जबरदस्त फेक आणि ध्रुपद गायकीतील बोलतान ही सर्व वैशिष्ट्ये त्यांच्या गाण्यात होती– जी जयपूर घराण्याची प्रतिज्ञा व शिस्त ठरली यात नवल नाही. ह्या घराण्याचे हे

अनुक्रमणिका

फुळधम, कुलाचार त्या घराण्यातील शिष्यांना श्रद्धेने आणि कटाक्षाने पाळावे लागतात.

स्वर आणि लय यांचा अतूट आविष्कार ऐकणाऱ्याला भव्यतेचा साक्षात्कार निश्चितच घडवितो. जो अतूटपणा आलापात तोच तानेतही. अर्थात यासाठी दीर्घश्वास आणि दीर्घ रचना अत्यावश्यकच आहे. हा भव्यतेचा साक्षात्कार कै. श्रीमती केसरबाई केरकर आणि श्रीमती मोगूबाई कुर्डीकर यांच्या गायनातून प्रभावीपणे दिसावयाचा. मात्र या अतूटपणाच्या अतिरेकामुळे एका स्वरावर स्थिर होणे, तो वेगवेगळ्या रीतीने सजविणे अथवा प्रत्येक स्वराचे जे आपापले वेगळे सौंदर्य असते त्याचा आस्वाद घेणे या गायकीत दिसून येत नाही, कारण ते लयीच्या बंधनात सतत जखडलेले असतात. स्वरांचा असा मुक्त आविष्कार किराणा घराण्याच्या गायकीतून मात्र दिसतो. दुसरे असे की संगीतातील 'उपज' अथवा 'बोलबनाव' हे अंग जे गायकाची प्रतिभा पणास लावून गायन खुलवीत असते त्याचाही अभाव या गायकीत दिसतो. बोलांच्या साहाय्याने एखादी सुरावट सजवून श्रोत्यांना पुनर्प्रत्ययाचा आनंद देणे आणि स्थायीचे रूप सतत डोळ्यासमोर ठेवणे ह्या गोष्टी केवळ 'आ' काराच्या अट्टहासामुळे शक्य होत नाहीत. आस, मींड यांच्या आवर्जून केलेल्या अंतर्भावामुळे गायकीत 'बोज' आपोआप सांभाळला जातो. पण त्यासाठी ठराविक प्रकृतीचेच राग गायले जातात त्यामुळे वेगवेगळ्या प्रकृतीच्या रागांच्या रसास्वादालाही ही गायकी मुकली आहे असेच म्हणावे लागेल. बंदिश मात्र चपखलपणे मांडली जाते. मात्र बिलंपत भरताना 'आ' काराच्या प्रतिज्ञेमुळे तीत शब्दमाधुर्य तर दिसतच नाही, शिवाय तोचतोचपणा येऊन मैफिल कधी कधी कंटाळवाणी रूक्ष वाटू लागते. हा माझा स्वानुभव.

४) जयपूर गायकीमध्ये सूक्ष्मकामगतीवर भर, तानेमध्ये दिसून येतो. दोन, दोन, तीन, तीन स्वरांच्या जोड्या घेऊन लयीशी विशिष्ट नाते ठेवून तान बांधली जाते. थोडक्यांत ठाय लयीतही आलाप आणि तानांना लयीच्या दृष्टीने न्याय देणारे हे घराणे आहे. अनवट रागांचे प्राबल्य या घराण्यात जास्त करून दिसते. परंतु त्यातही एकसूत्रीपणा आढळून येत नाही. शिवाय तार षड्जाचे महत्त्व– जे किराणा, ग्वाल्हेर, आग्रा घराण्यात प्रामुख्याने आढळते ते या गायकीत नाही. शिवाय इंग्रजीत ज्याला आपण Pause म्हणतो- हा क्षणभरच असला तरी बरंच काही सांगून जातो, त्याचाही विचार या घराण्याने केलेला दिसत नाही. किंबहुना पुष्कळशा घराण्यांना या सौंदर्यबिंदूंची जाणीवही झालेली दिसत नाही. थोडक्यात, लेखकाच्या मते अमूर्ताकडे 'झुकणारी' ही बुद्धिप्रधान गायकी आहे.

**आग्रा घराण्याचाही विचार** तितक्याच सांगोपांग केलेला दिसतो. या घराण्याचे जनक घग्गे खुदाबक्ष होत. यांनी ग्वाल्हेरचे नथ्थन पीरबक्ष यांचेकडून घेतलेली ग्वाल्हेर गायकी आणि स्वतःच्या घराण्याची ध्रुपद गायकी यांचा मनोहर मिलाफ करून आपली गायकी बनवली. या गायकीची पुढील वैशिष्ट्ये आहेत : रागशुद्धता- वादी-संवादी, वर्ज्यावर्ज्य वगैरे निव्वळ व्याकरणाचा विचार न करता महत्त्वाचे स्वरांचे लगाव आणि रागप्रकृतीनुसार

भावाभिव्यक्ती हे या गायकीचे उद्दिष्ट आहे.

बंदिशीच्या अंगाने राग भरणे- बंदिशीनुसार रागविस्तार हे या आणि ग्वाल्हेर गायकीचेही वैशिष्ट्य आहे.

भारदस्तपणा- 'जयपूर' प्रमाणे याही घराण्यात गायकीत आणि आवाजात 'बोज' पैदा करणे हे महत्त्वाचे समजले जाते. यासाठी आवाजाचा विशिष्ट पद्धतीचा रियाज, सतत मनन, चिंतन म्हणजेच मानसिक रियाजही आवश्यक आहे. शिवाय दमसासही तितकाच आवश्यक आहे.

५) लय-तालावर प्रभुत्व ही या गायकीची जीवन निष्ठाच आहे. खरं म्हणजे उत्तम संगीताविष्कारासाठी या दोन्ही गोष्टी साध्य झाल्या तरच तो उत्तम कलाकार होऊ शकतो. मग तो कोणत्याही घराण्याचा असो. जयपूर गायकीप्रमाणे बिलंपत निव्वळ 'आ' काराने न भरता बोल आलाप, बोल प्रस्तारच्या अंगाने स्वरांना सजविले जाते, म्हणजेच स्वरांबरोबर शब्दांनाही तितकेच महत्त्व देणारी ही गायकी आहे. तानेचेही दोन प्रकार या घराण्यात दिसतात. ग्वाल्हेर अंगाची सरळ तान आणि छोट्या स्वरावलींनी गुंफलेली डावपेचयुक्त तान. अशा रीतीने गायकीच्या सर्व अंगोपांगांचा विचार करून बनवलेली ही गायकी आहे, असे लेखकाचे मत आहे. दोन्ही गायकींवर घेतल्या जाणाऱ्या आक्षेपांचे खंडनही लेखकाने तितक्याच समर्थपणे केले आहे. तरी पण आग्रा घराण्याकडे लेखकाचा ओढा जास्त आहे हे वाचताना पदोपदी जाणवते आणि त्यांच्या प्रत्यक्ष गाण्यातून सुद्धा.

थोडेसे सरगम या प्रकाराबद्दलही सूतोवाच ते करतात. त्यांच्या मते ह्या प्रकाराची गायनात तितकीशी जरुरी नाही. परंतु म. अमीरखाँ साहेब ज्या ढंगाने 'सरगम' करीत ते ऐकल्यावर सरगमची थोडीशी झलक गायनात जरूर दाखवावी, असे मला वाटते.

पठडी ह्या संकल्पनेबद्दल आमची पिढी किती बेफिकीर आहे, उदासीन आहे हे सांगून एकूणच निष्ठा ही भावना कोणत्याही कलेच्या बाबतीत ढासळत चालली आहे, असेच ते म्हणतात.

शेवटी या दोन्ही घराण्यांतील समान गुणधर्म काय आहेत म्हणजेच दोन तंबोऱ्यांतील सुसंवाद कुठे साधतो आणि विसंवाद कुठे आहे ते सांगून साधकाने यातून काय घ्यावे आणि किती हे त्यानेच ठरवायचे आहे. एकूण पुस्तक अतिशय वाचनीय आहे. दोन्ही घराण्यांच्या गायकीचा इतका सखोल आणि तौलनिक आढावा घेतलेला इतर पुस्तकांतून दिसत नाही. अशाच पद्धतीने इतरही घराण्यांचा पुस्तक रूपाने सांगोपांग विचार करण्याची आवश्यकता आज संगीत क्षेत्रात उत्पन्न झाली आहे.

(जुळू पाहणारे दोन तंबोरे : बबनराव हळदणकर, राजहंस प्रकाशन, पुणे ३०,
पृष्ठे १७६, मूल्य ६५ रुपये)

(९१/१, स्नेहलबाग, तुळशीबागवाले कॉलनी, पुणे ४११ ००९.)



अनुक्रमणिका







डॉ. हे. वि. इनामदार

# ब्राह्म समाजाचा अद्ययावत इतिहास

सनातन धर्मक्षेत्र म्हणून प्रसिद्ध असलेल्या वाई या गावी साठ वर्षांपूर्वी ब्राह्म समाजाच्या चळवळीला आरंभ झाला, ही काहीशी अल्पज्ञात पण आश्चर्यकारक घटना आहे. कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांच्यापासून प्रेरणा घेऊन, श्री. रामराव कृष्णराव बाबर यांनी वाईला ब्राह्म समाजाची स्थापना केली. प्रारंभापासून प्रदीर्घ काळापर्यंत रामरावांनी त्या संस्थेची वाईला जोपासना केली. 'महर्षी शिंदे आणि वाई ब्राह्म समाज' या आपल्या पुस्तकात त्यांनी ब्राह्म समाजाच्या वाईतील कार्याचा साधार इतिहास वस्तुनिष्ठ रीतीने सादर केला आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासात त्यांच्या या कार्याचे महत्त्व मोठे आहे. 'महर्षी शिंदे यांच्या मौलिक विचारामुळे मी ब्राह्म समाजाकडे वळलो. त्याची अखेरपर्यंत सेवा करण्याचे ठरविले. पुढील पिढीला मार्गदर्शन व्हावे, या हेतूने ग्रंथलेखनाचे हे धाडस मी केले आहे,' हे त्यांचे निवेदन जेवढे विनम्र, तेवढेच लक्षणीय आहे. १९९० साली, स्वतःच्या वयाच्या ८६ व्या वर्षी, त्यांनी हे इतिहासकथन केले आहे, हे तर विशेष अभिनंदनीय आहे. म्हणूनच 'श्री. रामराव बाबर यांच्या या ग्रंथामुळे उदार धर्मविषयक साहित्यामध्ये मोलाची भर पडली आहे,' हे डॉ. गो. मा. पवार यांचे म्हणणे सार्थ ठरते.

दहा प्रकरणे आणि नऊ परिशिष्टे यांमध्ये प्रस्तुत ग्रंथाची मांडणी केलेली आहे. वाईतील धर्मकार्याची पूर्वपीठिका लेखकाने आरंभी दिली आहे. तेहेतीस साली महर्षी शिंदे यांच्या अध्यक्षतेखाली 'वाई तालुका अस्पृश्यता निवारण परिषद' झाली. त्यानंतर वाईस प्रार्थना संघाची स्थापना झाली. ते कळल्यावर महर्षी शिंदे यांनी रामरावांना पत्र पाठवून त्यांचे अभिनंदन केले. त्यातूनच पुढे त्यांनी वाईला भेट दिली; व तिथे थोडे दिवस वास्तव्यही केले. साप्ताहिक उपासना, संगत-सभा, वनोपासना आणि सहभोजन अशा विविध उपक्रमांतून समान विचाराची मंडळी एकत्र आली. त्यातूनच प्रार्थना संघाचा उत्सव तेथे साजरा झाला. कौटुंबिक उपासना, महिलांच्या सभा आणि भजने यांतून धर्मजागृती होऊ लागली. प्रार्थना संघाचे काम वाढत गेले. स्थानिक मित्रांचे सहकार्य घेऊन रामरावांनी प्रार्थना मंदिरासाठी इमारत उभी केली. यथावकाश 'वाई प्रार्थना संघाचे' नाव 'ब्राह्म समाज' असे ठेवण्यात आले. आरंभ-काळात त्यांना नारायणराव कृष्णाजी चव्हाण, बाबूराव पंडित, यज्ञेश्वरपंत भांडारकर, शंकरराव जेजुरीकर, जनाक्का शिंदे, कर्मवीर भाऊराव पाटील अशा ज्येष्ठ व्यक्तींचे साहाय्य झाले. १९३४ मध्ये पहिला वार्षिकोत्सव साजरा झाला.

वाईच्या टिळक मंदिरापासून गंगापुरीतल्या महारवाड्यापर्यंतच्या विविध ठिकाणी ब्राह्म समाजाचे कार्यक्रम साजरे झाले. चव्वेचाळीस साली या संस्थेला महात्मा गांधींनी भेट दिली. मराठा मोफत वाचनालय, ब्राह्मणेतर परिषद, शिवजयंती उत्सव, क्रेडिट सोसायटीची स्थापना, अस्पृश्य परिषद, राममोहन वसतिगृहाची स्थापना, बोपेगावच्या हरिजन वस्तीला मदत, जीर्णोद्धार फंडाची उभारणी, बालकाश्रमाची स्थापना, रुग्णसेवा मंडळाचा शुभारंभ अशी अनेक समाजोपयोगी कामे या संस्थेने गेल्या सहा दशकांत केली आहेत.

या ग्रंथाच्या शेवटी लेखकाने वाई ब्राह्म समाजाचा निवडक पत्रव्यवहार उद्धृत केला आहे. तसेच त्या समाजाचे आजवरचे पदाधिकारी, उपासना, व्याख्याने, कीर्तने, ग्रंथप्रकाशने व महत्त्वाच्या घडामोडी यांची माहिती परिशिष्टातून दिली आहे.

महर्षी शिंदे यांच्या व्यक्तिमत्त्वाचे काही प्रसन्न व प्रेरक पैलू वाचकांच्या प्रत्ययाला आणून देण्यामध्ये लेखकाला यश लाभले आहे, कार्यनिष्ठा आणि आत्मलोप हे लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचेही गुणविशेष त्याच्या निवेदनातून व्यक्त झाले आहेत.

लेखकाची निवेदनशैली सुगम व सुसूत्र आहे. तारखांचे तपशील, ठरावांचे मसुदे आणि व्यक्तींचे नामनिर्देश हे सारे त्याने अचूकपणे नोंदविले आहे. विविध अधिवेशने, परिषदा आणि उत्सव यांच्या हकिकती त्याने साधार दिल्या आहेत. वाई प्रांतासारख्या ग्रामीण परिसरात एकेश्वरी धर्ममताचा प्रसार करण्याच्या हेतूने स्थापन झालेल्या ब्राह्म समाजाचा हा इतिहास अद्ययावत आणि अचूक आहे. १९०५ मध्ये रामराव बावर यांचा जन्म झाला. आज या उतारवयात त्यांनी सिद्ध केलेले हे ब्राह्म समाज-दर्शन त्या क्षेत्रातील अभ्यासकांना वरदानच वाटेल.

( महर्षी विठ्ठल रामजी शिंदे आणि वाई ब्राह्म समाज:रामराव कृष्णराव बावर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे डेमी १४५, मूल्य ६५ रुपये)

('संतोष,' भारती निवास कॉलनी, ६०/१५ एरंडवणे, पुणे-४११००४.)

## कार्यवृत्त : ऑक्टोबर-डिसेंबर १९९३

कविवर्य गिरीश यांच्या जन्मशताब्दीनिमित्त दि. २९ ऑक्टो. १९९३ रोजी 'मला जाणवलेले कवी गिरीश' या विषयावर डॉ. पंडित आवळीकर यांचे भाषण आयोजित करण्यात आले. तसेच दि. २९ नोव्हें. ९३ या दिवशी कविवर्य माधव ज्युलियन यांच्या ५४व्या पुण्यतिथीच्या निमित्ताने पुण्यातील नव्या-जुन्या कवींचे संमेलन आयोजित करण्यात आले. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन डॉ. शंतनु चिंधडे यांनी केले होते.

महाराष्ट्रातील थोर विचारवंत आहिताग्नी शं. रा. राजवाडे यांच्या स्मरणार्थ डॉ. शंकर अभ्यंकर यांचे भाषण झाले. कार्यवाह गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले.

सालाबादप्रमाणे मासिक मनोरंजनकार कै. का. र. मित्र यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ आयोजित होणारी व्याख्यानमाला या वर्षी दि. ११ ते २० डिसेंबर या कालावधीत पार पडली. मराठी रंगभूमीला या वर्षी दीडशे वर्षे पूर्ण झाली. त्या निमित्ताने मराठी रंगभूमीच्या स्थितीगतीचा परामर्श घेणारी पुढील दहा व्याख्याने झाली :

| | वार | दिनांक | विषय | वक्ते |
|---|---|---|---|---|
| १ | शनिवार | ११-१२-९३ | उद्घाटन : मराठी रंगभूमीची वाटचाल | श्री. आत्माराम सावंत |
| २ | रविवार | १२-१२-९३ | संगीत रंगभूमी | डॉ. श्रीरंग संगोराम |
| ३ | सोमवार | १३-१२-९३ | नाटक मंडळया | श्री. गो. रा. जोशी |
| ४ | मंगळवार | १४-१२-९३ | गद्य रंगभूमी | श्री. दीनानाथ टाकळकर |
| ५ | बुधवार | १५-१२-९३ | दिग्दर्शन श्री. राजा नातू | |
| ६ | गुरुवार | १६-१२-९३ | नेपथ्य व तांत्रिक अंगे | श्री. मोहन वाघ |
| ७ | शुक्रवार | १७-१२-९३ | बाल-रंगभूमी | श्री. वासुदेव पाळंदे |
| ८ | शनिवार | १८-१२-९३ | नाट्य-स्पर्धा | डॉ. विश्वास मेहेंदळे |
| ९ | रविवार | १९-१२-९३ | प्रायोगिक रंगभूमी | डॉ. वि. भा. देशपांडे |
| १० | सोमवार | २०-१२-९३ | समारोप : | सौ. कीर्ती शिलेदार-तडवळकर |

जानेवारी १९९४ मध्ये कै. वि. द. घाटे व कै. चिं. वि. जोशी यांच्या स्मृतिदिनाचे कार्यक्रम आयोजित करण्यात आले. 'शिक्षणक्षेत्र : विनाअनुदानाच्या समस्या' या विषयावर मंगळवार दि. १८ जाने. रोजी कै. वि. द. घाटे स्मृतिदिनाच्या अनुषंगाने डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांचे भाषण झाले. त्याचप्रमाणे दि. १९ जाने. रोजी कै. चिं. वि. जोशी स्मृतिदिनानिमित्त मराठीतील उत्कृष्ट विनोदी पुस्तकाच्या लेखकास व प्रकाशकास कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत देण्यात येणारे कै. चिं. वि. जोशी पारितोषिक या वर्षी श्री. भा. ल. महाबळ यांना त्यांच्या 'नवरा बनवावा तसा बनतो' या पुस्तकास देण्यात आले. तसेच सुयोग प्रकाशनच्या सौ. सुचेता राळे यांनाही या पुस्तकाच्या प्रकाशनाबद्दल परिषदेतर्फे सन्मानित करण्यात आले. परीक्षकांच्या तर्फे श्री. श्रीनिवास भणगे यांनी आपले मनोगत व्यक्त केले. त्यांच्याबरोबर परीक्षक म्हणून सौ. शकुंतला फडणीस यांनीही काम पाहिले. अध्यक्षस्थानी सुप्रसिद्ध हास्यचित्रकार श्री. शि. द. फडणीस होते.

माधव ज्युलियन यांच्या जन्मशताब्दीनिमित्त दि. २१ जाने. १९९४ रोजी एक विशेष कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. अध्यक्षस्थानी श्री. गोपिनाथ तळवलकर होते. या वेळी डॉ. अश्विनी धोंगडे यांचे माधव ज्युलियन यांच्या कवितेविषयी व्याख्यान झाले. या प्रसंगी डॉ. मो. ज्ञा. शहाणे, श्री. स. कृ. पाध्ये, कॅ. दिनकर पटवर्धन, डॉ. द. न. गोखले, डॉ. सु. रा. चुनेकर यांचा सत्कार करण्यात आला. याच वेळी परिषदेचे कार्यवाह श्री. रवींद्र भट यांनी कै. माधव ज्युलियन यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने वर्षभर दरमहा सादर करावयाच्या एका विशेष कार्यक्रमाची माहिती दिली.

दि. २८, २९, ३० जानेवारी रोजी पणजी येथे भरलेल्या अखिल भारतीय मराठी










साहित्य संमेलनात परिषदेचे कार्यवाह डॉ. गं. ना. जोगळेकर आणि श्री. रवींद्र भट यांनी कार्यक्रमाच्या संयोजनामध्ये, तसेच परिसंवाद आणि कविसंमेलनामध्ये महाराष्ट्र साहित्य परिषदेचे प्रतिनिधित्व केले.

या वर्षी श्री. माधवराव चिपळूणकर यांनी रुपये १०,००० ची निरपेक्ष देणगी तसेच स्वातंत्र्यवीर सावरकर यांची भव्य प्रतिमा साहित्य परिषदेला भेटी-दाखल दिली. या देणगीबद्दल परिषद त्यांची कृतज्ञ आहे.

**रवींद्र भट**
**कार्यवाह**

## उमलते अंकुर

*कै. माधवराव पटवर्धन ऊर्फ माधव ज्युलियन यांच्या जन्मशताब्दीनिमित्त महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे 'उमलते अंकुर' ही अभिनव योजना राबविली जाणार आहे. कविता हा अभिजात साहित्याचा प्रथम हुंकार आहे. परंतु साहित्य प्रांतात कवितेला आज फारसे उज्ज्वल भवितव्य नाही. कविता पुस्तकरूपाने प्रकाशित होत नाहीत. झाल्यातरी वाचकांचा फारसा प्रतिसाद मिळत नाही. नव्या पिढीतील अनेक उदयोन्मुख कवी/कवयित्री आपल्या तरल मनाची सारी स्पंदने आणि सामाजिक, राजकीय ताणतणावांची शब्दरूपे कविताबद्ध करीत आहेत. ती कविता लोकाभिमुख करण्याचा कोणताही मार्ग त्यांच्यापुढे आज उपलब्ध नाही. या नव्या अंकुरांची नवी कविता रसिकांसमोर यावी, त्यावर विचार व्हावा, त्यातील अनावश्यकता, रचनेमधील क्लिष्टता, त्रुटी त्यांना समजावून द्याव्यात आणि एक रसपरिपुष्ट आणि लोकाभिमुख कविता त्यांच्याकडून अपेक्षावी, या अपेक्षित कवितेला योग्य त्या माध्यमातून प्रसिद्धी द्यावी, असे या योजनेचे स्वरूप आहे. नवोदित कवी/ कवयित्रींनी आपल्या कविता परतीच्या पोस्टेजसह रवींद्र भट, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३० या पत्त्यावर पाठवाव्यात. दर महिन्याच्या २१ तारखेला त्यातील निवडक कवींना आपल्या कविता सादर करण्यास आमंत्रित केले जाईल.*










# शाखा कार्यवृत्त

## इस्लामपूर

### ४ फेब्रुवारी १९९४

'ज्ञानेश्वर, तुकाराम, केशवसुत आणि मर्ढेकर हे काव्य क्षेत्रातील प्रमुख टप्पे ठरतात. कवी माधव ज्युलियन हा या टप्प्यातील पुढचा प्रवास आहे. रोमँटिझमचा पुरस्कार करणारा हा कवी बंडखोर कवी म्हणूनही समजला जातो. आपल्या जीवनात अनेक कटु प्रसंगांना त्यांना सामोरे जावे लागले त्याला त्यांनी धैर्याने तोंड दिले आणि तरीही त्यांनी आपला कवितेचा व्यासंग जोपासला हे त्यांचे वैशिष्ट्य आहे. आजच्या कवींनी माधव ज्युलियन यांचा आदर्श घ्यावा व कोणत्याही टीका-टिप्पणीला न जुमानता आपला व्यासंग वाढवावा त्यातच त्यांची प्रगती होऊ शकेल,' असे मनोगत कार्याध्यक्ष प्रा. डॉ. मधुकर हसमनीस यांनी कवी माधव ज्युलियन जन्मशताब्दीनिमित्त आयोजित केलेल्या समारंभात प्रमुख पाहुणे म्हणून बोलताना व्यक्त केले.

प्रास्ताविक व स्वागत श्री. सदानंद वोंगाणे यांनी केले.

१० डिसेंबर ९३-'आचार्य जावडेकर यांचे विचार' या विषयावर श्री. पांडुरंग डिंगरे यांचे मार्गदर्शनपर भाषण झाले.

आचार्य जावडेकर यांच्या प्रतिमेस त्यांच्या हस्ते पुष्पहार अर्पण करण्यात आला. तसेच आचार्य जावडेकर जन्मशताब्दी समितीचे अध्यक्ष श्री. वाय. एस. जाधव यांनी राजारामबा पाटील यांच्या प्रतिमेस पुष्पहार घातला. या प्रसंगी प्रा. डॉ. तारा भवाळकर (सांगली) राजारामबापू पाटील ज्ञान प्रबोधिनीचे कार्यवाह प्रा. श्यामराव पाटील व इतर मान्यवर उपस्थित होते.

पाहुण्यांचा परिचय श्री. सदानंद वोंगाणे (कोषाध्यक्ष) यांनी करून दिला. सूत्रसंचालन श्री. विलास कुलकर्णी यांनी व आभार प्रा. दशरथ पाटील यांनी मानले.

१४ डिसेंबर १९९३-कविवर्य ग. दि. माडगूळकर यांचा १६ वा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. श्री. विलास कुलकर्णी यांनी ग. दि. मा. यांच्या प्रतिमेस पुष्पहार अर्पण केला.

'ग. दि. माडगूळकर यांनी तमाशाच्या बोर्डापासून देवघरातील नंदादीपापर्यंत आपल्या प्रतिभेचा साक्षात्कार घडवून आणला. माणगंगेचा हा राजहंस आयुष्यभर आपल्या काव्याने लोकांना आनंद देत राहिला, परंतु साहित्य क्षेत्रात मात्र त्यांची कवी म्हणून पाहिजे त्या मर्यादेपर्यंत दखल घेतली गेली नाही' अशी खंत कवी अरुण महाळुंगकर (इस्लामपूर) यांनी प्रमुख पाहुणे म्हणून बोलताना व्यक्त केली.

**शहानवाज मुल्ला, कार्यवाह**

## डोंबिवली

डोंबिवली शाखेने दि. २३ जानेवारी ९४ रोजी 'गडकरी स्मृतिदिन' कार्यक्रम आयोजित केला होता. डोंबिवलीतील सुप्रसिद्ध कवी श्री. मधुकर जोशी, प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते.










श्री.जोशी यांनी कै.गडकरी यांच्या कवितेची व त्यांच्या नाटकांची वैशिष्ट्ये सांगून काही विशेष आठवणी सांगितल्या. तसेच त्या काळातील सामान्य माणूस, सामाजिक स्थिती याचे वर्णन करून कै. गडकरी यांना कसे हालात जीवन कंठावे लागले यावद्दल काही किस्से सांगितले. त्यानंतर त्यांनी स्वतःच्या गाजलेल्या कवितांची माहिती दिली व कवितावाचन केले.

डोंबिवली शाखा आणि के.वि.पेंढारकर महाविद्यालय यांच्या संयुक्त विद्यमाने दि.१२ डिसेंबर १९९३ रोजी 'मराठी रंगभूमीचा शतकोत्तर सुवर्णमहोत्सव' आयोजित केला होता. अध्यक्षस्थानी श्री. वि. आ. बुवा, उद्घाटक श्री. आत्माराम सावंत व प्रमुख वक्ते प्रा. मुरलीधर सायनेकर होते; तसेच समारोप दिग्दर्शक श्री. दिलीप कोल्हटकर यांच्या हस्ते झाला. या कार्यक्रमात श्री. बापू लिमये यांनी, समीक्षक अशोक समेळ यांची मुलाखत घेतली.

**मधुकर देशपांडे**
कार्यवाह

## धुळे

धुळे शाखेचे कार्याध्यक्ष तथा सुपरिचित कवी, पत्रकार डी. बी. जगत्पुरिया यांच्या 'ठिणगी' या गाजलेल्या कविता-संग्रहाला गतवर्षाचा १९९३चा राज्यस्तरीय, प्रतिष्ठाप्राप्त अस्मितादर्श वाङ्मय पुरस्कार मिळाला आहे. या निमित्ताने डी.बी.जगत्पुरिया यांचे अभिनंदन.

**सौ. उषा पाटील**
**सौ. भाग्यरेखा जोशी**
कार्यवाह

## जळगाव

१४ ऑक्टोबरला कवी खलील मोमीन यांनी 'मी आणि माझी कविता' या विषयावर विचार मांडून काव्यवाचन केले. आगामी 'अक्षराई' या संग्रहातील अनुनय, मुक्तता, कवितेची कच्ची वही या कविता सादर केल्या. शाखेचे अध्यक्ष नारायण शिरसाळे यांनी पाहुण्यांचे स्वागत व परिचय करून दिला. कार्यवाह प्रा. मधुकर साळुंखे यांनी कै. बाजीराव पाटील व खानदेशचे कवी भगवान कोळी या द्वयांना श्रद्धांजली अर्पण केली.

२१ ऑक्टोबरला बालकथा लेखक मा. धों. वे. जोगी यांच्या 'आणि ती राणी झाली' या बालकथा संग्रहाचे प्रकाशन उमविचे कुलगुरू डॉ. एन. के. ठाकरे यांचे हस्ते करण्यात आले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी माजी प्राचार्य वाय. एस. महाजन होते. प्रमुख वक्ते म्हणून कवी प्रा. राजा महाजन होते. या वेळी धों. वे. जोगी यांनी मनोगत व्यक्त केले.

**प्रा. मधुकर साळुंखे**
**डॉ. प्रभाकर जोशी**
कार्यवाह



अनुक्रमणिका

## ठाणे

२० जून ९३ या दिवशी शाखेचा वर्धापन दिन प्रा. म. वा. धोंड यांच्या 'मायबोलीशी दुरावा' ह्या व्याख्यानाने साजरा केला. या वेळी बोलताना ते म्हणाले, 'मराठी भाषा मुमुक्षु आहे काय? असा प्रश्न वि. का. राजवाडे यांनी १९२६ साली विचारला. मुमुक्षु म्हणजे मरणाच्या पंथाला लागलेली. या स्थितीत अजून देखील फरक पडलेला नाही. २००० वर्षे मृत झालेली हिब्रू भाषा विसाव्या शतकात पुन्हा जिवंत झाली. इस्राएलमध्ये शिक्षण, शासकीय कामकाज यासाठी या भाषेचा प्रयोग केला जातो. अशी जिद्द हवी. हे लोक धर्म, संस्कृती, भाषा, देश यांचे अभिमानी आहेत. मायबोलीपासून दुरावा याचा अर्थ संस्कृती साहित्य व इतिहास यापासून पारखे होणे. अर्थात यामुळे आपण आईपासून दुरावतो, भावंडांपासून दुरावतो, मराठी भाषिकांपासून दुरावतो आणि यामुळे स्वतःपासूनही दुरावतो.'

शाखेचे संस्थापक प्रा. म. वि. फाटक यांचे ६ वे स्मृतिपुष्प प्रा. डॉ. अनंत देशमुख यांच्या 'साहित्यिकांची आत्मचरित्रे' या विषयावरील व्याख्यानाने साजरे झाले. या वेळी बोलताना त्यांनी सांगितले, इंग्रजी राजवटीनंतर आत्मचरित्रे लिहिण्याची भावना निर्माण झाली. टिळकांच्या काळात ही नव्हती. आपली प्रतिमा उंचावण्याचा प्रयत्न अनेक आत्मचरित्रकार करतात. 'माझा मृत्युलेख' ही राम गणेश गडकरी यांची चार ओळींची कविता उत्कृष्ट आत्मचरित्राचा नमुना म्हणता येईल. गो. नी. दांडेकर यांचे स्मरणगाथा. यात वैचित्र्यपूर्ण जीवन आहे. प्रासादिक भाषा यामुळे वाचनीय. कुसुमाग्रजांचे विरामचिन्हे अप्रतिम. कुसुमानिल-उत्तम. गडकऱ्यांच्या रोजनिशादेखील कितीतरी माहिती देणाऱ्या आहेत. गदिमांचे मंतरलेले दिवस चांगला अनुभव देऊन जाते. नाच ग घुमा-माधवी देसाई कैफियतच. यातून रणजित देसाई बाद केल्यास काहीच उरत नाही. स्मृतिचित्रे, गतगोष्टी- न. चिं. केळकर. आमच्या आयुष्यातील अकरा वर्षे-लीला पटवर्धन, आमच्या आयुष्यातील आठवणी-रमाबाई रानडे, आहे मनोहर तरी इत्यादी आत्मचरित्रांचा देखील त्यांनी या कार्यक्रमाच्या वेळी विचार केला.

१० ऑक्टोबर रोजी ध्वनिमुद्रित काव्यदर्शन हा कार्यक्रम ध्वनिमुद्रिकासंग्राहक श्री. गोविंद साठे यांच्या मुलाखतीद्वारे सादर करण्यात आला. म. पां. भावे व विनायक मोहरीर यांनी साठे यांची मुलाखत घेतली. या वेळी जुनी मराठी भावगीते, गीते व कविता यांचे श्रवण ध्वनिमुद्रिका वाजवून करण्यात आले.

**पद्माकर शिरवाडकर**
कार्यवाह



अनुक्रमणिका







(१५) **हिंदू संस्कृतीचे सत्य स्वरूप :** वि. पां. डेगवेकर, आनंदी पांडुरंग प्रकाशन, पृष्ठ– ८६, मूल्य– ३०/-

(१६) **मंगल गाणी :** सौ. कुमुदिनी जोशी, ग्रंथविशेष प्रतिष्ठान, पृष्ठ– ३२, मूल्य– २०/-

(१७) **क्रांतिबा फुले (चित्र नाट्यकथा) :** फ. मु. शिंदे, प्रबुद्ध नायक शिक्षण विकास प्रतिष्ठान, पृष्ठ– ७५, मूल्य– ५०/-

(१८) **मर्युत्का :** सौ. सुहासिनी पाटील, पृष्ठ– १९३, मूल्य– ४०/-

(१९) **अति दक्षता :** यशवंत भिवसन पाटील, पृष्ठ– ५६, मूल्य– २०/-

(२०) **सुर्वे यांचे विद्यापीठ :** संपादन– प्रा. पुष्पा राजापुरे, संदर्भ प्रकाशन, पृष्ठ– ३०६, मूल्य– १५०/-

(२१) **'प्रभात' कार वा. रा. कोठारी : विचार आणि कार्य :** संपादक– डॉ. सौ. मृणालिनी शहा, डॉ. जयंत वष्ट, श्री. श. वि. राशिनकर, वा. रा. कोठारी जन्मशताब्दी समिती, पुणे. पृष्ठ– ४००, मूल्य– १५०/-

(२२) **शोध संवाद :** डॉ. रमेश आवलगांवकर, साहित्यसेवा प्रकाशन, पृष्ठ– १६६, मूल्य ७५ /-

(२३) **निर्धार ते लोकसत्ता :** माधव यशवंत गडकरी, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ– ४३४, मूल्य– २५०/-

(२४) **वेचलेले क्षण :** प्रदीप तुंगारे, शरद श्री. कर्वे– पुणे, पृष्ठ– ६७, मूल्य– २५/-

(२५) **अखेर पाय मातीचेच :** रा. शं. दातार, कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे, पृष्ठ– ७०/-, मूल्य– २०/-

(२६) **पाहुणा :** अभिराम भडकमकर, कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे, पृष्ठ– ९५, मूल्य– २०/-

(२७) **रंग एकेकाचे :** निर्मलकुमार फडकुले, कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे, पृष्ठ– १४८, मूल्य– ४०/-

(२८) **तंजावरच्या भोसले राजांची नाटके :** डॉ. संजीवनी देशमुख, प्रा. माया सरदेसाई, कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे, पृष्ठ– २८५, मूल्य– १००/-

(२९) **आम्ही पाहिलेले फुले :** संपा. हरि नरके, महात्मा फुले चरित्र साधने प्रकाशन समिती महाराष्ट्र शासन मुंबई पृष्ठ– २०९, मूल्य– ३५/-

(३०) **चांदण्यातले झाड :** उषा परब, चिंतामणी साहित्य सहयोग सहकारी प्रकाशन संस्था मर्यादित, पृष्ठ– ६६, मूल्य– ४५/-

(३१) **सूरपारंब्या :** वसंत माधव, चिंतामणी साहित्य सहयोग सहकारी प्रकाशन संस्था मर्यादित, पृष्ठ– २३, मूल्य २०/-

(३२) **समुद्रस्पर्श :** प्र. श्री. नेरूरकर, चिंतामणी साहित्य सहयोग सहकारी प्रकाशन संस्था मर्यादित, पृष्ठ– १८१, मूल्य ९०/-

(३३) **ज्ञानगंगा :** सोनेरी सकाळ, बी. ए. जाधव, कल्पतरू कलापथक पुणे, पृष्ठ– १२६, मूल्य– ४०/-



अनुक्रमणिका

(३४) **भूकंपाची मरणगाणी :** फ.मुं.शिंदे, साहित्यसेवा प्रकाशन पृष्ठे– ३२, मूल्य– २०/-

(३५) **हैदराबादचा मुक्तिसंग्राम आणि आम्ही :** श्रीनिवास खोत– दिगंबर विर्धे, साकेत प्रकाशन प्रा. लि., पृष्ठे १८७, मूल्य ९०/-

(३६) **पाणलोट क्षेत्रात पीक नियोजन :** प्रा. व. ग. मुसांडे, प्रा. स. वि. देशमुख, डॉ. सु. भि. वराडे, साकेत प्रकाशन प्रा. लि., पृष्ठे– ७५, मूल्य– ३५/-

(३७) **मुलीच्या नावानं :** महावीर जोंधळे, साकेत प्रकाशन प्रा. लि., पृष्ठ– ८८, मूल्य– ३६/-

(३८) **पाणीच पाणी :** रा. पि. शिरकांडे, सु. भि. वराडे, साकेत प्रकाशन प्रा. लि, पृष्ठे– १३६, मूल्य– ६०/-

(३९) **पक्षीजीवन :** रवींद्र भावसार, साकेत प्रकाशन प्रा. लि. पृष्ठ– ११७, मूल्य– ६०/-

(४०) **शेवंता जित्ती हाय :** प्रल्हाद जाधव, साकेत प्रकाशन प्रा. लि. पृष्ठे–६८, मूल्य– ३०/-

(४१) **एबारो बारो :** सत्यजित राय, अनुवाद– विलास गिते, पृष्ठे– १८२, मूल्य– ८०/-

(४२) **सांजझळा :** महादेव शिंदे, लतिका प्रकाशन, मुंबई, पृष्ठे– ५६, मूल्य– २०/-

(४३) **महात्मायन :** वसंत पालेकर, स्व. सौ. दमयंती पालेकर प्रतिष्ठान, मुंबई, पृष्ठे– १०२४, मूल्य– ४००/-

(४४) **डॉ. बाबासाहेब आंबेडकर गौरव ग्रंथ :** संपादक मंडळ; दया पवार, प्रा. केशव मेश्राम, वामन निंबाळकर, अर्जुन डांगळे, प्रा. बा. ह. कल्याणकर, डॉ. एस. एस. भोसले, हरि नरके, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई पृष्ठे– ६०७

(४५) **मराठी रंगभूमी : उगम आणि विकास :** हिरामण लांजे, विवेक प्रकाशन, पृष्ठ– १२७, मूल्य– ७०/-

(४६) **आसक्ती :** व. शं. खानवेलकर. वर्षा प्रकाशन, पृष्ठ– ११८, मूल्य– ५०/-

(४७) **श्री ज्ञानेशांचा सिद्धानुवाद :** ह. भ. प. प्रल्हाद बुवा, सुबंध, श्री. प्रज्ञा प्रकाशन, पृष्ठ– ८६, मूल्य– ५०/-

(४८) **हॉटेल माझा देश :** डी. बी. रत्नाकर, सन्मित्र प्रकाशन, पृष्ठ– ६९, मूल्य– ३०/-

(४९) **कविता– रती– बालकवी विशेषांक खंड २ :** संपादक– पुरुषोत्तम पाटील, पृष्ठ– १८८,

(५०) **काठ :** डॉ. एस. एल. भैरप्पा. मराठी अनुवाद– उमा वि. कुलकर्णी, चंद्रकला प्रकाशन, पृष्ठे– ३४३, मूल्य– १५०/-

(५१) **प्रिन्सिपॉल भय्याजी कायंदे यांचे सहवासात :** ह. श्री. परांजपे, कीर्ती प्रकाशन, पृष्ठे– ११३, मूल्य– ३०/-

(५२) **सरकार ते सरकार :** ना. व्यं. देशपांडे, मौज प्रकाशन गृह, पृष्ठ– २२४, मूल्य– १००/-

□

## महाराष्ट्र साहित्य परिषद

### नवे आजीव सदस्य : ऑक्टोबर-डिसेंबर १९९३

पुणे

टाकूर केशव सखाराम, साळुंखे शंकरराव नानासाहेब, तांवडे सुजित पांडुरंग, साने चंद्रकांत काशीनाथ, सौ. कुलकर्णी उमा वि., आपटे सुगंधा सुनीर, दिवाण राजशेखर त्र्यंबक, बोडस शरद कृष्णाजी, सौ. केळकर वसुंधरा अविनाश

(अन्य ठिकाणचे)

पुजारी श्रीकांत सिद्दापा (बेळगाव), डॉ. सहस्रबुद्धे अचला वि. (जबलपूर), टकले गिरीश सदाशिव (नाशिक), मुख्याध्यापिका, डॉ. सी. एम्. मेहता कन्या विद्यामंदिर (कोपरगाव), प्राचार्य के. जे. सोमय्या कॉलेज (कोपरगाव), डॉ. डी. एस. मुळे (कोपरगाव), डॉ. जोशी प्रदीप के. (जळगाव), कु. चौधरी सुभद्रा भटू (धुळे), प्रा. बोरसे अशोकराव वेडूजी (धुळे), श्रीमती मोगलाईकर शैलजा नंदी (धुळे), प्रा. सौ. घोगरे मनीषा हरीष (धुळे), भामरे नरेंद्र लक्ष्मण (धुळे), खरोटे संजय जनार्दन (कल्याण), बागडे रतन भिलाजी (कल्याण), डोमाडे अर्जुन भीमा (ठाणे), कुलकर्णी मंजुषा मोहन (कल्याण), बर्वे श्रीहरी श. (कल्याण), सौ. टुमणे अमिता अजित (कल्याण), सौ. वैद्य अपर्णा भा. (कल्याण), कोरान्ने नीलकंठ वि. (कल्याण), संत गंगाधर विष्णु (कल्याण), डॉ. सौ. जोग सुप्रिया हरि (दादर), नाशिककर महेंद्र रामेश्वर (कल्याण), रडे माधवराव रोहिदास (कल्याण), महामुलकर शिवाजी हैबतराव (कल्याण), डॉ. फडके सुरेश यशवंत (कल्याण), पांडे संदीप बाळकृष्ण (कल्याण), काणे दिलीप गजानन (कल्याण), लेले उल्हास वसंत (कल्याण), भालेराव सुरेश मोरेश्वर (कल्याण), गोखले विनायक मोरेश्वर (कल्याण), वाव भटू नागो (मु. पो. अंजूर, जि. ठाणे), सौ. बेदरकर सुनंदा किरण (कल्याण), फडके विश्वनाथ अनंत (कल्याण), तामडे हेमंत रामनाथ (कल्याण), पै. सीताराम आनंदराव (कल्याण), ठाकूर सोमसिंग चंद्रसिंग (कल्याण), डॉ. सौ. परांजपे विजया प्रकाश (कल्याण), पानसरे दीपाली अंबादास (कल्याण), सौ. कुलकर्णी माधवी माधव (कल्याण), गोखले विद्यादेवी बाळकृष्ण (कल्याण), पटवर्धन मनोहर नारायण (कल्याण), भावे सुरेश घनश्याम (कल्याण), सौ. गोसावी वैशाली विजय (कल्याण), केळकर प्रभाकर गजानन (कल्याण), सौ. चिटणीस अपर्णा शामकांत (कल्याण), शुक्ल प्रभाकर रघुनाथ (कल्याण), शिधोरे काशिनाथ प्रभाकर (कल्याण), डॉ. कुलकर्णी नवीन विश्वास (कल्याण), डॉ. वेलणकर राहुल नारायण (कल्याण), देशपांडे गणेश लक्ष्मण (कल्याण), डॉ. सौ. गाडगीळ विद्या मोहन (कल्याण), सौ. कर्वे शुभदा अनंत (कल्याण), कुलकर्णी उमेश दत्तात्रय (कल्याण), जोशी पराग वामन (कल्याण), सौ. नाईक सुप्रिया हरीश (कल्याण), तिबिले अनंत दत्तात्रय (कोल्हापूर), कवठेकर शरद श्रीकृष्ण (डोंबिवली), डॉ. पात्रेकर प्रमोद नथुराम (डोंबिवली), देसाई भरत भगवान (डोंबिवली), देशपांडे सुरेश चिंतामण (डोंबिवली), घांगरेकर मोहन रामचंद्र

(डोंबिवली), विंझे अरविंद नारायण (डोंबिवली), सौ. छेडा ललिता मूळचंद (डोंबिवली), सौ. टेंबे संध्या अरुण (डोंबिवली), सौ. नवरे गीता शशिकांत (डोंबिवली), सौ. कुलकर्णी अभया जनार्दन (डोंबिवली), वाडेकर रमेश नरहर (डोंबिवली), सौ. महाजन सुनंदा चंद्रकांत (डोंबिवली), गोगटे पंढरीनाथ विष्णू (डोंबिवली), सौ. शिर्के नीलांबरी महादेव (सांगली), वडवे ज्ञानेश्वर यशवंत (सातारा), श्री. वाव मोहन (मुंबई),

## साभार स्वीकार

(१) **शष्कुली** : संपादक : प्राचार्य व्ही. डी. कासार प्राध्यापिका (सौ.) लता प्रकाश महाजन, पद्मश्री (डॉ.) दि. गो. तथा आप्पासाहेब पवार, चेअरमन, कृषी विकास प्रतिष्ठान बारामती पृष्ठे ७२, मूल्य २०.

(२) **काटवोरे** : (मुलांसाठी कविता), डॉ. भाऊ मांडवकर, सेवा प्रकाशन पृष्ठे– ३६, मूल्य– १५/-

(३) **काळाच्या पडद्याआड** : प्रा. द. पं. जोशी, मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश खंड १, पृष्ठे– ३३६, मूल्य– २२५/-

(४) **काळाच्या पडद्याआड** : प्रा. द. पं. जोशी, मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश खंड २, पृष्ठे– ४३०, मूल्य– २२५/-

(५) **काळाच्या पडद्याआड** : प्रा. द. पं. जोशी, मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश खंड ३, पृष्ठ– ५८९, मूल्य– २२५/-

(६) **अपर्णा** : परशुराम द. देशपांडे, प्रचार प्रकाशन, पृष्ठे– ८०, मूल्य– १८/-

(७) **पुराणपुरुष** : योगिराज श्री श्यामाचरण लाहिरी, संकलक– योगिराजांचे नातू श्री सत्यचरण लाहिरी, अनुवाद– श्री. चंद्रशेखर पाध्ये, प्रकाशिका श्रीमती अमिता चट्टोपाध्याय– कलकत्ता, पृष्ठे– २६९, मूल्य– ८०/-

(८) **तफावत** : केशव बा. वसेकर, वी. रघुनाथ प्रकाशन, पृष्ठे– ९२, मूल्य– ४०/-

(९) **फुजीसानचा सुंदर देश** : कुमार द्वा. साठे, व्हीनस प्रकाशन, पृष्ठ– ७७, मूल्य– ६०/-

(१०) **झूमका** : हो. पां. वायळ वन्सीलाल, केदारेश्वर साहित्य सहवास पृष्ठे– ४७, मूल्य– १२/-

(११) **स्मृतिपत्रे** : लेखक कै. धोंडो वामन टिल्लू, संपादन श्री. मोहन पाठक, पृष्ठे– २१९, मूल्य– नाही.

(१२) **फुलेंची मुलं** : अंबादास खेतमाळस, श्री विशाखा प्रकाशन पृष्ठे– ४७, मूल्य– १०/-

(१३) **मावंदे** : चंद्रकांत वर्तक, विश्वमोहिनी प्रकाशन, पृष्ठे– १३६, मूल्य– ७०/-

(१४) **संत शिरोमणी श्री सावता महाराज यांचे चरित्र** : डॉ. वि. य. कुलकर्णी, श्री. मा. गो. डोमाळे, पृष्ठे– ७२, मूल्य– ३/-

अनुक्रमणिका

(१५) **हिंदू संस्कृतीचे सत्य स्वरूप :** वि. पां. डेगवेकर, आनंदी पांडुरंग प्रकाशन, पृष्ठ– ८६, मूल्य– ३०/-

(१६) **मंगल गाणी :** सौ. कुमुदिनी जोशी, ग्रंथविशेष प्रतिष्ठान, पृष्ठ– ३२, मूल्य– २०/-

(१७) **क्रांतिबा फुले (चित्र नाट्यकथा) :** फ. मु. शिंदे, प्रबुद्ध नायक शिक्षण विकास प्रतिष्ठान, पृष्ठ– ७५, मूल्य– ५०/-

(१८) **मर्युत्का :** सौ. सुहासिनी पाटील, पृष्ठ– १९३, मूल्य– ४०/-

(१९) **अति दक्षता :** यशवंत भिवसन पाटील, पृष्ठ– ५६, मूल्य– २०/-

(२०) **सुर्वे यांचे विद्यापीठ :** संपादन– प्रा. पुष्पा राजापुरे, संदर्भ प्रकाशन, पृष्ठ– ३०६, मूल्य– १५०/-

(२१) **'प्रभात' कार वा. रा. कोठारी : विचार आणि कार्य :** संपादक– डॉ. सौ. मृणालिनी शहा, डॉ. जयंत वष्ट, श्री. श. वि. राशिनकर, वा. रा. कोठारी जन्मशताब्दी समिती, पुणे. पृष्ठ– ४००, मूल्य– १५०/-

(२२) **शोध संवाद :** डॉ. रमेश आवलगांवकर, साहित्यसेवा प्रकाशन, पृष्ठ– १६६, मूल्य ७५ /-

(२३) **निर्धार ते लोकसत्ता :** माधव यशवंत गडकरी, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ– ४३४, मूल्य– २५०/-

(२४) **वेचलेले क्षण :** प्रदीप तुंगारे, शरद श्री. कर्वे– पुणे, पृष्ठ– ६७, मूल्य– २५/-

(२५) **अखेर पाय मातीचेच :** रा. शं. दातार, कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे, पृष्ठ– ७०/-, मूल्य– २०/-

(२६) **पाहुणा :** अभिराम भडकमकर, कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे, पृष्ठ– ९५, मूल्य– २०/-

(२७) **रंग एकेकाचे :** निर्मलकुमार फडकुले, कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे, पृष्ठ– १४८, मूल्य– ४०/-

(२८) **तंजावरच्या भोसले राजांची नाटके :** डॉ. संजीवनी देशमुख, प्रा. माया सरदेसाई, कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे, पृष्ठ– २८५, मूल्य– १००/-

(२९) **आम्ही पाहिलेले फुले :** संपा. हरि नरके, महात्मा फुले चरित्र साधने प्रकाशन समिती महाराष्ट्र शासन मुंबई पृष्ठ– २०९, मूल्य– ३५/-

(३०) **चांदण्यातले झाड :** उषा परब, चिंतामणी साहित्य सहयोग सहकारी प्रकाशन संस्था मर्यादित, पृष्ठ– ६६, मूल्य– ४५/-

(३१) **सूरपारंब्या :** वसंत माधव, चिंतामणी साहित्य सहयोग सहकारी प्रकाशन संस्था मर्यादित, पृष्ठ– २३, मूल्य २०/-

(३२) **समुद्रस्पर्श :** प्र. श्री. नेरूरकर, चिंतामणी साहित्य सहयोग सहकारी प्रकाशन संस्था मर्यादित, पृष्ठ– १८१, मूल्य ९०/-

(३३) **ज्ञानगंगा :** सोनेरी सकाळ, बी. ए. जाधव, कल्पतरू कलापथक पुणे, पृष्ठ– १२६, मूल्य– ४०/-










(३४) **भूकंपाची मरणगाणी** : फ. मुं. शिंदे, साहित्यसेवा प्रकाशन पृष्ठे- ३२, मूल्य- २०/-

(३५) **हैदराबादचा मुक्तिसंग्राम आणि आम्ही** : श्रीनिवास खोत- दिगंबर विर्धे, साकेत प्रकाशन प्रा. लि., पृष्ठे १८७, मूल्य १०/-

(३६) **पाणलोट क्षेत्रात पीक नियोजन** : प्रा. व. ग. मुसांडे, प्रा. स. वि. देशमुख, डॉ. सु. भि. वराडे, साकेत प्रकाशन प्रा. लि., पृष्ठे- ७५, मूल्य- ३५/-

(३७) **मुलीच्या नावानं** : महावीर जोंधळे, साकेत प्रकाशन प्रा. लि., पृष्ठ- ८८, मूल्य- ३६/-

(३८) **पाणीच पाणी** : रा. पि. शिरकांडे, सु. भि. वराडे, साकेत प्रकाशन प्रा. लि, पृष्ठे- १३६, मूल्य- ६०/-

(३९) **पक्षीजीवन** : रवींद्र भावसार, साकेत प्रकाशन प्रा. लि. पृष्ठ- ११७, मूल्य- ६०/-

(४०) **शेवंता जित्ती हाय** : प्रल्हाद जाधव, साकेत प्रकाशन प्रा. लि. पृष्ठे-६८, मूल्य- ३०/-

(४१) **एबारो बारो** : सत्यजित राय, अनुवाद- विलास गिते, पृष्ठे- १८२, मूल्य- ८०/-

(४२) **सांजझळा** : महादेव शिंदे, लतिका प्रकाशन, मुंबई, पृष्ठे- ५६, मूल्य- २०/-

(४३) **महात्मायन** : वसंत पालेकर, स्व. सौ. दमयंती पालेकर प्रतिष्ठान, मुंबई, पृष्ठे- १०२४, मूल्य- ४००/-

(४४) **डॉ. बाबासाहेब आंबेडकर गौरव ग्रंथ** : संपादक मंडळ; दया पवार, प्रा. केशव मेश्राम, वामन निंबाळकर, अर्जुन डांगळे, प्रा. बा. ह. कल्याणकर, डॉ. एस. एस. भोसले, हरि नरके, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई पृष्ठे- ६०७

(४५) **मराठी रंगभूमी : उगम आणि विकास** : हिरामण लांजे, विवेक प्रकाशन, पृष्ठ- १२७, मूल्य- ७०/-

(४६) **आसक्ती** : व. शं. खानवेलकर. वर्षा प्रकाशन, पृष्ठ- ११८, मूल्य- ५०/-

(४७) **श्री ज्ञानेशांचा सिद्धानुवाद** : ह. भ. प. प्रल्हाद बुवा, सुबंध, श्री. प्रज्ञा प्रकाशन, पृष्ठ- ८६, मूल्य- ५०/-

(४८) **हॉटेल माझा देश** : डी. बी. रत्नाकर, सन्मित्र प्रकाशन, पृष्ठ- ६९, मूल्य- ३०/-

(४९) **कविता- रती- बालकवी विशेषांक खंड २** : संपादक- पुरुषोत्तम पाटील, पृष्ठ- १८८,

(५०) **काठ** : डॉ. एस. एल. भैरप्पा. मराठी अनुवाद- उमा वि. कुलकर्णी, चंद्रकला प्रकाशन, पृष्ठे- ३४३, मूल्य- १५०/-

(५१) **प्रिन्सिपॉल भय्याजी कायंदे यांचे सहवासात** : ह. श्री. परांजपे, कीर्ती प्रकाशन, पृष्ठे- ११३, मूल्य- ३०/-

(५२) **सरकार ते सरकार** : ना. व्यं. देशपांडे, मौज प्रकाशन गृह, पृष्ठ- २२४, मूल्य- १००/-

□










# साकेत प्रकाशनाची नवी पुस्तके

| क्र. | पुस्तकाचे नाव | लेखकाचे नाव | किंमत |
|---|---|---|---|
| १. | सामुदायिक आरोग्य आणि परिचारिका सेवा | डॉ. वरीदे/डॉ. कुलकर्णी | १५०-०० |
| २. | आंबा बाग | डॉ. अनंतराव पाटील | ६०-०० |
| ३. | पाणीच पाणी | शिरकांडे/वराडे | ६०-०० |
| ४. | भाजीपाला कीड आणि नियंत्रण | प्रा. दत्ताजी पवार | ६०-०० |
| ५. | कृत्रिम उपग्रह आणि अवकाशविज्ञान | सुधाकर भालेराव | ८०-०० |
| ६. | शास्त्रज्ञांची दैनंदिनी | प्रभाकर इनामदार | ७०-०० |
| ७. | दे दान सुटे गिऱ्हान | आर. के. त्रिभुवन | ७५-०० |
| ८. | दलितसाहित्य- चर्चा आणि चिंतन | गंगाधर पानतावणे | १००-०० |
| ९. | हैद्राबादचा मुक्तिसंग्राम आणि आम्ही | खोत/विर्धे | ९०-०० |
| १०. | ऐकण्याची कला | सतीश पोरे | ५०-०० |
| ११. | उर्वरित नंतर | भालचंद्र देशपांडे | ९०-०० |
| १२. | कागद किमया | अमर परदेशी | ५०-०० |
| १३. | आक्रंदन | शशिकांत तासगांवकर | ४५-०० |
| १४. | भारतीय नृपती | श. रा. देवळे | ५०-०० |
| १५. | दीपमाळ | श. रा. देवळे | ५०-०० |
| १६. | मुखवटे | जे. के. जाधव | ५५-०० |
| १७. | शेवंता जित्ती हाय | प्रल्हाद जाधव | ३०-०० |

१८. शेतीविषयक ४५ पुस्तके उपलब्ध.
१९. बालवाङ्मय प्रकल्प पुस्तके ३०० मिळतील.
२०. ग्रंथालयास लागणारी सर्व रजिस्टर्स मिळतील.



साकेत प्रकाशन प्रा. लि.
साकेत, ११५ म. गांधीनगर, फायरब्रिगेड मार्ग, स्टेशन रोड, औरंगाबाद ४३१००५.
फोन : २६६९२, २६६९५

*महाराष्ट्र साहित्य परिषदेची संग्राह्य प्रकाशने*



*मराठी वाङ्मयाचा इतिहास*

खंड २ रा

(१३५० ते १६८०) संपादक-स. गं. मालशे रुपये. ११०/-

*मराठी वाङ्मयाचा इतिहास*

खंड ६ भाग १

(१९२० ते १९५०) संपादक-गो. म. कुलकर्णी

व. दि. कुलकर्णी

रु. १३५

*मराठी वाङ्मयाचा इतिहास*

खंड ६ भाग २

(१९२० ते १९५०) संपादक-गो. म. कुलकर्णी

व. दि. कुलकर्णी

रु. १३५/-

*भाषा व साहित्य: संशोधन*

खंड ३

संपादक-डॉ. वसंत जोशी

प्रा. म. ना. अदवंत

रु. ८०/-

---

**प्राप्तिस्थळ**

कार्यवाह,

# महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०

---

अनुक्रमणिका





माधवराव पटवर्धन ऊर्फ कविवर्य माधव जुलियन

जन्म : २१ जानेवारी १८९४ निधन : २९ नोव्हेंबर १९३९

१९३६ मध्ये जळगाव येथे भरलेल्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

संपादक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, १९३६-३७

अनुक्रमणिका

